स ढ सं ग्र ह

# रामदासकृत

## अभंग.



माधवचंद्रोबा

यांनीं

शुद्ध करून




लोककल्याणार्थ

स्वताच्या

शिलाछापखान्यांत छापिले.


मुंबई.

शके १७८९

सन १८६८

# रामदासकृत बाळक्रीडा.

## अभंग.

नमस्कार माझा हा विघ्ननाशना शारदा आननामाजी राहो १
राहो सर्वकाळ गोविंदाचें नाम कीर्तन उत्तम यादवाचें २
यादवाचे कुळीं गोकुळीं गोविंद आनंदाचा कंद अवतरला ३
अवतरला पूर्ण अवतारी अच्युत आयुधें मंडित चतुर्भुज ४
चतुर्भुज हरी डोळस सांवळा वैजयंती माळा पीतांबर ५
पीतांबरधारी प्रकटे मुरारी मथुरेमाझारीं कारागृहीं ६
कारागृहीं माता पीता वसुदेव तेथें आले देव सोडवणें ७
सोडवणें आला वैकुंठींचा राव येतांचि राघव थोर केलें ८
थोर केलें कर्म सर्वा भुलवीलें स्वयें आच्छादीलें नीजरूप ९
निजरूप देवें सोडुनी कौतुक जहाला बाळक नंदजीचें १०
नंदजीचें बाळ करि पंथ मोकळा जावया गोकुळा विश्रांतीसी ११
विश्रांतीसी आलें स्थळ पालटलें नवल जाणवलें कंसराया
कंसराय जाय मारूं आपटोनी मन गडबडोनी उसळली १३
उसळली म्हणे कंसा तुझा वैरी गोकुळामाझारी वाढतसे १४
वाढतसे वैरी नंदाची कुमारी बोलोनी अंबरीं गुप्त झाली १५
झाली तळमळ ऐकतां कंसासी लागली मानसीं थोर चिंता
थोर चिंता करी म्हणे माझा वैरी वाढतसे मारी कोण आतां १७
कोण आतां तरी करावा उपाय वैरीया अपाय होय जेणें १८
होय जेणें मृत्यु तया बाळकासी तंव आले जोसी म्हाबळभट

म्हाबळभट आले रायें सन्मानीले तयाप्रती बोले कांहीं एक२०
कांहीं एक भटो मांडिलें संकट तंव थेरें पट उकलीला २१
उकलीला पट पाहीला मुहूर्त म्हणे चिंता व्यर्थ कां करीतां २२
कां करितां चिंता तया बाळकाची वधूनि शीघ्रचि येतों आतां२३
येतों आतां ऐसें बोलोनि वचन शीघ्रचि गमन आरंभिलें २४
आरंभिलें तेथें ब्रम्हांड गमन पावला भूवन नंदजीचें २५
नंदजीचें बाळ आलें मुळावरी बैसऊनि नारी सांगतसे २६
सांगतसे म्हणे हें तुम्हां बाईट कुळाचा शेवट करूं आलें२७
करूं आलें घात सर्वांचें अनहीत वोखटें बहूत दिसतसे२८
दिसतसे दुष्ट सांगतों मी स्पष्ट बुद्धिनें वरिष्ठ आहों आम्ही
आहां तुम्ही माझे कीं हो यजमान म्हणोनि सांगणें लागे आम्हां३०
लागे आम्हा शब्द ऐसें न करावें सत्वर वधावें लेंकुरासी ३१
लेंकुरासी क्रोध ऐकूनि वचन मग पीढेदान आरंभीलें ३२
आरंभीलें थोर कठिण द्वीजासी उठोनि त्वरेसी पळतसे ३३
पळतसे पुढें मागें पीढे दान पृष्ठीचें कंदन तें होतसे
होतसे ताडन काष्ठाचें सुहृकडून कष्टला ब्राम्हण पळतसे३५
पळतसे भय भरलें अंतरीं म्हणे हरी हरी नारायण ३६
नारायणें मज रक्षीलें जीवेसीं दावी रायापासीं पृष्ठभाग३७
पृष्ठभागीं थोर झालेंसे ताडण भटो बहु सीण पावलेती ३८
पावलीती पूतना म्हणे काय झालें बाळकें मारिलें ब्राम्हणासी
ब्राम्हणासी जेणें दिल्हें पीढे दान तयासी मारीन शीघ्रकाळें

दावीतसे भाव शब्दाचें लाघव जाणीयेली माव बाळकानें
बाळकासीं पुढें घेउनि चुंबन देत स्तनपान आदरेंसीं ४५
आदरेंसी हरी स्तनपान करी पूतना अंतरीं जांजावली ४६
जांजावली म्हणे पुरे बापा आतां जाऊंदे अनंता सोड वेगीं
सोड वेगीं हातें लोटिलें श्रीमुख नीघेना बाळक शोषीतसे
शोषीली पूतना आक्रंदे मानसीं मुकली प्राणासी कृष्णमुखें
कृष्णमुखें रीठासुर रगडीला लातीं बीदारीला शकटासूर ५०
शकटासूर लातीं हाणें बाळपणीं वृक्ष उन्मळूनी सांगतसें ५१
सांगतां सांगतां देवें गीळीयेला उदरीं दाविला विश्व लोक ५२
विश्वलोक नांदे जयाचे अंतरीं गाई राखे हरी गोळीयांच्या ५३
गोळीयांच्या गाई राखी नयेवेळीं खेळे चेंडूफळी गोपाळांसीं ५४
गोपाळांसीं चेंडु खेळतां उडाला जाउनी बुडाला डोहांमध्यें ५५
डोहांमध्यें कृष्णें टाकियेली उडी पहातातीं थडी सवंगडे ५६
सांगताती कृष्ण बुडाला तुमचा जेथें काळीयाचा डोहो आहे
डोहो आहे तेथें दावीति गोपाळ मीळाले सकळ विश्व[1] जन
विश्व जन सर्व पहाती गोविंदा आक्रंदे यशोदा दीनरूप ५९
दीनरूप माता करितें रोदन संबोखिती जन यशोदेसी ६०
यशोदेसी ठव दाविला गोपाळीं मोडली डहाळी कळंबाची ६१

१ सर्व.

कळंबाची छाया दिसे जळावरी बुडाला श्रीहरी तयेगाई ६२
तये गाई माना घालुं पाहे उडी धरिती देवगडी नगरलोक ६३
नगरलोक सर्व गोपाळ रुदती गाई हुंबरती कृष्णालागीं ६४
कृष्णालागीं सर्वजन आक्रंदती मग संबोखिती थेर थेरां
थेरथेरां संबोखुनियां निघाले कृष्णें काय केलें डोहामाजी
डोहामाजी क्रूर काळिया वीरवार परस्परें थोर युद्ध झालें
युद्ध झालें थोर काळिया नाथीला गोकूळासीं आला कृष्णनाथ ६८
कृष्णनाथें अगबगविभांडीले धेनुका मारीलें आपदूनी ६९
आपदूनी मांडी खेळती गोपाळ घूमरी कल्लोळ पांवयांचे ७०
पांवयांचे नाद वाजती मोहरी तेणें नगर नारी लुब्ध होती ७१
लुब्ध होती पक्षी नर वनचर यमुनेचें नीर तुंबळलें ७२
तुंबळले गोप लागला वणवा गीळूनीयां अग्वा वधीयेलें ७३
वधीयेलें कृष्णें मत्तग आवर्ता दुष्टतृणावर्ता मारीयेलें ७४
मारीयेला गर्व थोर ब्राम्हणांचा जाहाला सर्वांचा समूदाय ७५
समूदाय सर्व गोपाळ स्वजन बळें गोवर्धन उचलीला ७६
उचलीला तळीं राखीलें गोकुळ इंद्राचा सकळ गर्व नेला ७७
नेलें मथुरेसीं अक्रूरें कृष्णासी मल्ल चाणूरासि वधीयेलें ७८
वधीयेला कंस घातलें आसन तेथें उग्रसेन बैसवीला ७९
बैसवीला उग्रसेन नृपासनीं चैद्यासी वासुनी मारीयेलें ८०
मारी शिशुपाळ आणि भौमासूर वधीला असुर जरासंध ८१
जरासंध काळयवन महासूर मारीले असुर थोर थोर ८२

थोर ख्याती केली अर्जुना रक्षीलें सर्व साह्य केलें पांडवांचें
पांडवांचा सखा सर्व साहाकारी संकटीं कैवारी द्रौपदीचा ८४
द्रौपदीचा सखा द्वारकेभीतरी सोळा सहस्र नारी गोपांगना
गोपांगना राधा रुक्मिणी सुंदरी सुखें राज्य करी यादवेंसी ८५
यादवांसीं शाप दिल्हा ऋषेश्वरीं साडिली बोहरी तेणें मीसें
तेणें मीसें सर्व आटले यादव तेकाळीं उद्धव उपदेशिला ८८
उपदेशीला दास श्रीकृष्णें आपुला अवतार झाला पूर्ण आतां ८९

---

# वैराग्यशतक.

## अभंग.

नमन योगीया स्वामीदत्तात्रेया गाईन वोविया संसारींच्या १
संसारींचें दुःख आठविलें मनीं मागें नाना योनी भोगीयेल्या
भोगीयेल्या परी नाहीं आठवण दुःख तें कठीण विसरलों ३
विसरलों राम चित्तीं दृढ काम तेणेंगुणें श्रम थोर झाला ४
झालों कासावीस थोरगर्भवासी नको त्या दुःखासी सांगवेना
सांगवेना सीण अत्यंत कठीण रामा तुजवीण दुःख झालें ६
दुःख झालें भारी मातेच्या उदरीं नवमासवरी कोंडीयेलें ७
कोंडियेलें मज अत्यंत सांकडीं रामा कोण सोडी तूजवीण ८
तुजवीण मज जाहालें बंधन जठरीं शयन जननीचें ९
जननीचें जठर संकोचित थोर विष्ठा आणि मूत्र नाकीं तोंडीं
नाकीं तोंडीं जंत वोती आणि पीत्त निर्बुजलें चित्त वायू नाहीं

वायु नाहीं तेथें वन्हीचा उबारा तेणें या शरीरा दुःख होय१२
दुःख होय थोर सर्वांग आहळे तेणेंगुणें पोळे अस्थीमात्र१३
अस्थीमात्र पंजर शिरीं वेटाळीला नाहीं गुंडाळीला मेदमांसें१४
मेद मांस कृमी कुत्सित कातडी गळती आंतडीं लवथवीत१५
ऐसें अमंगळ अत्यंत कुश्चीळ प्राण हा व्याकुळ होय दुःखें
दुखें आला श्वास तेणें कोंडे श्वास कोंडिलें उचेस घेतां नये१७
नये नये येतां सर्वथा बाहेरी ऐसी दाटी थोरी उकडीलों १८
उकडीतां प्राणी करी तळमळ नव जन्मकाळ आला पुढें१९
आलें पुढें अंत काळींचें संकट कष्टावरी कष्ट थोर झाले२०
थोर झाले कष्ट मातेच्या उदरीं सीणलों श्रीहरी दास तुझा२१
दास्य मी करीन ऐसें होतें ध्यान जन्म काळीं प्राण गेला माझा
गेला माझा प्राण झालें विस्मरण स्वामिचे चरण वीसरलों २३
विसरलों सोऽहं मग म्हणे कोऽहं जन्मकाळीं बहु दुःख झालें२४
दुःखें दुःखावलों म्हणे आहा आहा जन म्हणे टाहा फोडीयेला
फोडीयेला टाहो पडतां भूमीवरी दिवसें दिवस हरी विसरलों
विसरलों बुद्धि स्वहीताची कुद्धी अज्ञानाची वृद्धी होत असे२७
होत असे वृद्धी दृढ देह बुद्धी तूज कृपानीधी अंतरलों २८
अंतरलों सूख तूज वीसंबतां विषय भोगीतां दुःख झालें २९
दुःख झालें फार ऐसा हा संसार पुढें षड्विकार उद्भवलाः
उद्भवलें तेणें सुख दुःख कळे प्राण हा आंदोळे दुःख होतां
दुःख होय देहीं माता नेणे कांहीं मज वाचा नाहीं काय करूं

करीं देवा आतां माझी सोडवण दुःख हें दारुण भोगवेना ३५
भोगवेना दुःख संसारींचें आतां धांव बा अनंता पाव वेगीं ३६
पाव वेगीं दास सोडवीं आपुले लोभेंचि वाहिले माया-जाळीं
माया-जाळीं झालें दृढ माझें मन रामा तुझें नाम आठवेना ३८
आठवेना चित्तीं स्वहिताचें ज्ञान माय-बापें लग्न केलें लोभें
लोभें लग्न केलें मानीली आवडी पायीं ओढिली बेडी बंधनाची
बंधनाची बेडी प्रबळला काम मग कैंचा राम आठवेना ४१
आठवेना राम स्वामी त्रैलोक्याचा झालों कुटुंबाचा भार-वाही
भारवाही झालों रामा अंतरलों बंधनीं पडलों काय करूं ४३
काय करूं मज कामाचें सांकडें संसाराचें कोडें उगवेना ४४
उगवेना मन आठवे कांचन सर्वकाळ ध्यान प्रपंचाचें ४५
प्रपंचाचें ध्यान लागलें मानसीं चिंता अहर्निशी दुःश्चंचळ ४६
चंचळ मानस संसार उद्वेगें क्षणक्षणीं भंगे चित्तवृत्ती ४७
वृत्ती कांता धन पाहे जनमान इच्छेनें बंधन दृढावलें ४८
दृढावलें वोस प्रपंचाच्या माया तेणें गुणें व्यथा थोर झाली
थोर होय व्यथा तारुण्याच्या भरें कामाचें काबरें आवरेना ५०
आवरेना क्रोध तेणें होय खेद वृत्तीचा उच्छेद करूं पाहे ५१
करूं पाहे घात थोर युद्धीलाचा मार्ग स्वहीताचा अंतरलों ५२
अंतरलों भक्ती ठाकेना विरक्ती देवा तुझी प्राप्ती केवीं घडे ५३

केवीं घडे आसी मज पतीतासी  झाल्या पापराशी सांगूं कीति ५४
सांगूं कीती दोष झाले लक्ष कोटी  पुण्य माझे गांठी आढळेना ५५
आढळेना पुण्य पापाचे डोंगर  करितां संसार माझें माझें ५६
माझी माता पीता माझे बंधू जन  कन्या पुत्र धन सर्व माझें ५७
सर्व माझें ऐसा मानीला भरवसा  तूज जगदीशा वीसरलों ५८
वीसरलों तूज वैभवा करितां  शेरवीं माता पीता रोम झालीं ५९
राम झाली माता देखत देखतां  नरी म्हणे कांता पुत्र माझे ६०
माझे पुत्र माझे स्वजन सोयरे  दृढ देहीं भरे अहं-भाव ६१
अहंभावें मनीं दुःख आच्छादूनी  कर्ततसें जनीं अभीमानें ६२
अभिमान माथां वाहे कुटुंबाचा  अंतरीं सुखाचा लेश नाहीं ६३
नाहीं नाहीं सूख संसारीं पहातां  पुरे देवा आतां जन्म नको ६४
नको नको आतां घालूं या संसारीं  पोळलों अंतरीं काय करूं
काय करूं माझें नेणती स्वहीत  आपुलालें हीत पहातात ६६
पहातात सूख वैभवाचीं सखीं  कोणी मज शेखीं कामा नये ६७
कामा नये कोणी तुजवीण रामा  नेई नीजधामा माहीयेरा ६८
माहेरही माझें अंतरलें दुरी  लोभें दुराचारीं गोवीयेलें ६९
गोवीयेलें मज आपुलीया हीता  माझी कोणी चिंता केली नाहीं
केली नाहीं चिंता लोभें गुंडाळीलें  पीकूनी घेतलें सर्व माझें ७१
सर्व माझें गेलें झालें निःकारण  स्वामीचे चरण अंतरलों ७२
अंतरलों देवा आयुष्य वेचलें  अंतर पडलें काय करूं ७३
काय करूं आतां शरीरही गेलें  मज वोसडीलें जीवालागीं ७४

---
१ मेळी.

जीवाच्यागीं मज मोकलीलें देवा काय करूं देवा प्रारब्धा
प्रारब्धाचा ठेवा प्रपंचीं रंगला देहांतीं खंगला वृद्धपणीं ७६
वृद्धपणीं माझें चळलें शरीर श्रवण बधीर नेत्र गेले ७७
नेत्र गेले मज पहातां दीसेना स्वयें उठवेना पाय गेले ७८
पाय गेले तेणें दुःख होय भारी तेथेंचि बाहेरी जायवेना ७९
जायवेना तेणें झालें अमंगळ अत्यंत कुश्चीळ वात पित्त ८०
वात पित्त जन देखोनी पळती दुर्गंधी गळती नव नाळीं ८१
नवनाळीं वाहे दुर्गंधी न साहे वांती होऊं पाहे देखतांची ८२
देखतां सकळ सुटले पाझर मळ मुत्र धीर धरवेना ८३
धरवेना क्षुधा निद्रा आणि तृषा पर मनीं आशा प्रबळली
प्रबळली आशा झाली अनावर चिंता-तृष्णा-ज्वर सर्वकाळ
सर्वकाळ चित्तीं थोर लोलंगता खायासीं मागतां नेदी कोणी
नेदी कोणी कांहीं क्षीण झालों देहीं जीवलग तेही वोसंडीले
वोसंडीलें मज वैभव गेलीया देह खंगलीया दुःख झालें ८८
दुःख झालें थोर क्षुधा आवरेना अन्नही जिरेना वांती होय
वांती होय तेणें निर्बुजे वासना स्वादिष्ट चावेना दांत गेले ९०
दांत गेले तेणें जिह्वेसी बोबडी कंठ गडगडी बोलवेना ९१
बोलवेना अंत-काळींच्या विपत्ती सर्वही म्हणती मरेना कां ९२
मरेना कां आतां कासया वांचला देवा वीसरला नेणोनीयां ९३
नेणोनीयां याची मर्यादा खुंटली सकळां लागली चिंता मनीं
चिंता मनीं वाटे कृत्याची सकळां सर्वांसी कंटाळा आला थोर ९५

१ आवरायाला अशक्य - २ लंपटपणा.

दुरी ठेली सर्व दुःखाची चोरटी  कोणीच संकटीं सोडवीना ९८
सोडवीना कोणी श्रीरामावांचूनीं  संकटीं धांवणी राम करी ९९
राम करीतसे दासाचा सांभाळ  भक्तांचा स्नेहाळ राम माझा १००

# ज्ञान शतक.

संतांचे संगती काय प्राप्त होतें  तें तुम्हा नीरुतें सांगईन १
सांगईन परी मानसीं धरावें  मग उद्धरावें या संसारीं २
संसारींचें सार ज्या नाद्या नाहीं  तेंची पडे ठाईं संत-संगें ३
संतसंगें चूके जननी[1]जठर  दुस्तर संसार माया-जाळ ४
माया जाळ तूटे तरी देव भेटे  संत-संगें आटे भवसिंधु ५
भव[2] भयानक[3] बुडवी सकळां  त्याहूनि वेगळा साधूसंग ६
साधूसंग साधी असाध्य-वस्तूसी  जेथें आहे त्यासी वाट नाहीं
वाट नाहीं जेथें जावया इतरा  अभावींका नरा पाप-बुद्धी ८
पापबुद्धी झडे संतांचे संगती  नाहीं अधोगती गर्भवास ९
गर्भवास संतसंगें मुक्त होय  वेगीं धरी सोय आलीया रे १०
आलीया संसारीं स्वहीत वीचारीं  एके भावें धरीं संतसंग ११
संतसंग धरी धन्य तो संसारीं  बोलीले श्रीहरी भागवतीं १२
भागवत-गीता-सार निरूपण  त्याचें विवरण संत-संगें १३

---

१ मातेचें उदर (जन्म) २ संसार. ३ भयंकर.

संतसंगें कळे सर्व शास्त्रभाग आणि ज्ञान-योग अभ्यासें
अभ्यासें साधीतां कधीं नये हाता तें लाभे तत्वता साधूसंगें१५
साधूचेनी संगें अलभ्याचा लाभ मुक्ती हे सुलभ होत आहे
आहे एक देव परी तो वळेना जयासी मीळेना संतसंग१७
संतसंग नाहीं जयालागीं जनीं तया कां जननी प्रसवली१८
प्रसवली माता शीणचि उरला पुत्र नाहीं झाला हरीभक्त१९
हरीभक्त नर वंशाचें मंडण दोषाचें खंडण करीतसे २०
करीतसे भक्ती संताचे संगतीं सायुज्यता मुक्ती पावावया२१
पावावया मुक्ती हरीचें भजन श्रवण मनन सर्वकाळ २२
सर्वकाळ होय सार्थक श्रवणें ब्रम्हनिरूपणें संतसंगें २३
संतसंगें ब्रम्हपद वोळखावें वीवेकें पावावें निरंजन २४
नीरंजना जातां नाहीं जन वन अंतराळीं गमन एकाएकीं२५
एकाएकीं देव निर्मळ निश्चळ आतुडे आंजळ दुजेवीण२६
दुजेवीण देव एकला एकट उभा घनदाट मागें पुढें २७
मागें पुढें सर्व-देवांचा नायक सांपडे विवेक झालीयानें २८
झालीयानें कृपा संतसज्जनांची मग विवेकाची वाट फूटे २९
वाट अवघड पहातां दीसेना जेथें नाहीं मना समागम ३०
समागमें जातां वाट ची फूटेना संशय तुटेना बहूबोध ३१
बहुबोध पंथ कोणें तो धरावा दुजेपणीं देवा पावीजेना ३२
पावीजेना देव संतसंगावीण मार्ग हा कठीण विवेकाचा३३
वीवेकाचा मार्ग वीवेकें चालावा मनाचा त्यागावा संग सर्व३४

---

१ भूषण.

सर्व त्याग करीं पावसी श्रीहरी परी एक धरीं संत-संग ३५
संतसंगावीण त्याग हा घडेना श्रीहरी पडेना कदा ठायीं ३६
ठाव सज्जनाचा सज्जन जाणती तेथें नाहीं गती मीपणाची
मीपणाची गती संगाचें लक्षण ठउकी ही खूण सज्जनाची
सज्जनाचें वर्म सज्जनाला तूटे उतरा कुवाटे मायाजाळ ३९
मायाजाळ पाहों जातां आढळेना सर्वथा कळेना न पाहातां४०
पाहातां संसार माईक वेव्हार परी निरंतर लागलासे ४१
लागला दिसेना परी निरसेना माईक वासना सत्य झाली
सत्य झाली असे विवेकें निरसे निरसोनि वसे जवळीच४३
जवळीच आहे अंतरीं चोरटा आतां कोणत्या वाटा धांवसील
धांवसील परी वासना सरेना सर्वथा मरेना साधूवीण ४५
साधूवीण प्राणी पडती आटणी तप तीर्थाटणीं नानाकर्मीं
नानाकर्मीं देव चुकोनी राहीला सज्जनीं पाहीला अनूभवें
अनुभव सर्वदेहीं वेगळाले कोण झाले भले संतजन ४८
संत जन परी कोण ओळखावे कैसे ते जाणावे साधूजन४९
साधूची वोळखी साधु वोळखीला येर भांबावला माया धरी
माया धरी प्राणी जवळि चूकले नाहीं वोळखीले साधूजन
साधूजन कोण कसें वोळखण तेंचि निरूपण सांगीतलें ५२
सांगीतलें आहे मागें थोरथोरीं तेंची अवधारीं आलीया रे
आलीया रे साधू जाणावा कवणे तयाचीं लक्षणें असंख्यात
असंख्यात परी वोळखीकारणें साधू पूर्णपणें सारिखाची ५५

---

१ जाईना, नाशायावेना . २ तपतीर्थें फिरण्यांत .

सारीखाची दीसे जनाचीयापरी । परी तो अंतरीं वेगळाची ॥ ६६ ॥
वेगळाची ज्ञानें पूर्ण समाधानें । [1]स्वस्वरूपीं मनें वस्ती केली ॥ ६७ ॥
वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा । मीपणें आपदा तया नाहीं ॥
तया नाहीं काम तया नाहीं क्रोध । तया नाहीं खेद स्वार्थ बुद्धी ॥ ६८ ॥
बुद्धी निश्चयाची स्वरूपीं तयाची । कल्पना ठाईंची निर्विकल्प ॥
निर्विकल्प मद मत्सर सारीला । आणि संहारीला लोभ दंभ ॥
दंभ हा लौकीक विवेकें सांडीला । दुरी वोसंडीला अहंकार ॥
अहंकार नाहीं दुराशा[3] अंतरीं । ममताही दोरी मोकळली ॥ ७३ ॥
मोकळली भ्रांती शरीर संपत्ती । वैभव संगती लोलंगता ॥ ७४ ॥
लोलंगता नसे ज्ञानें धालेंपणें । ऐसीं हीं लक्षणें सज्जनाचीं ॥
सज्जन लक्षणें सांगेन उदंती । आर्त चित्तवृत्ती लांचावली ॥
लांचावली वृत्ती सज्जन संगती । होय सार्थकता जयांचेनी ॥
जयांचेनी ज्ञानें नरती अज्ञानें । साधू संगतीनें समाधानें ॥
समाधानें शांती क्षमा आणी दया । रंक आणी राया सारीखाची ॥
सारीखाची बोध जेथें नाहीं भेद । सर्वांसीं अभेद सर्व काळ ॥
सर्व काळ गेला श्रवणें मननें । सत्क्रिया साधनें हरीभक्ती ॥
हरीभक्ति करी जन तारावया । स्वधर्मा वीलया जाऊं नेदी ॥
जाऊं नेदी भक्ति जाऊं नेदी ज्ञान । अनुतापीं मन निरंतर ॥
निरंतर भाव सद्गुणीं भजन । येणें बहुजन उद्धरती ॥ ७४ ॥
उद्धरती जन करीतां साधन । क्रीयेचें बंधन आचरतां ॥ ७५ ॥
आचरतां साधूजना होय बोधू । लागतसे वेधू भक्तीभावें ॥ ७६ ॥

---

१ आत्मस्वरूपीं. २ विकल्परहित. ३ दुष्टइच्छा. ४ लंपटपणें.

... करी तोयाटंग आदरेसा ७८
आदरेंसी विधी करणें उपाधी लोकांतें सद्बुद्धी लागावया ७९
लागावया बुद्धी सत्क्रिया भजन करीतो सज्जन मुक्तीदाता ८०
मुक्तीदाता साधू तोचि तो जाणावा जेणें संपादावा लोकाचार ८१
लोकाचार करी तो जना उद्धरी ज्ञाता अनाचारी कामा नये ८२
नये नयेनिंदू जनीं जनार्दन म्हणोनी सज्जन क्रियावंत ८३
क्रियावंत साधू वीरक्त विवेकी तोचि तो लौकिकीं मान्य आहे
मान्यता सत्क्रिया लौकीक सोडीला तोचि उद्धरीला जनीं नाहीं
जनीं नाहीं मान्य तो सर्व अमान्य म्हणोनीयां धन्य क्रियावंत ८६
क्रियावंत तेणें लौकीक सोडावे आणि बसावे ब्रम्हारण्य ८७
ब्रम्हारण्य सेवी साधू तो एकला जना नाहीं आला उपेगासी[1] ८८
उपेगासीं येणें जना पूर्णपणें तयाचीं लक्षणें निरूपीलीं ८९
निरुपिलीं येणें लक्षणें जाणावा साधू वोळखावा मुमुक्षनें ९०
मुमुक्षूनें गूरू क्रिया भ्रष्ट केला तरीं अंतरला दोहीं पक्षीं ९१
दोहींपक्षीं रूढ तया ज्ञान बोध येर तें अबद्ध अनाचार ९२
अनाचार करिसा कोण आहे जनीं पुरी निरूपणीं बोलिजेतें
बोलीज साचार सत्य निरूपणीं घडे तें करणी सुरवें करू ९४
करूनये कदा मिथ्या निरूपण करीतां दूषण लागों पाहे ९५
पाहें पाहें बापा साधा तें शोधुनी टाकेना म्हणोनी निंदू नको
निंदू नको शास्त्र निंदू नको वेद तरीच स्वानंद पावसील ९७

१ उपयोगास.

पावसाळे गेलीं ऋद्ध निरूपण

# उपदेशशतक.

उपदेश-रीती आतां सांगईन होईं सावधान आळीया रे १
आळीया रे सांग तूं कोण आहेसी वेगीं आपणासीं ठाई पाडी
ठाई पाडी तूज तूंचि चूकलासी देहाचा धरीसी अभीमान २
अभिमान देहीं कोण आहे याचा पांचा पंचकांचा स्थूल देह ४
स्थूल देह दृश्य याचा तूं जाणता देह मी म्हणतां जीवदशा ५
जीवदशा गेली साक्षित्वें वर्ततां ईश्वर नथता याचें नाव ६
नाव रूप देही साक्षी तो विदेही या वीवेकीं नाहीं देह-बुद्धी ७
देहबुद्धी भाव या स्थूल देहाचा उरे संदेहाचा लिंगदेह ८
लिंगदेह मन वासनेची वृत्ती होतसे निवृत्ती साक्षीरूपें ९
साक्षीरूपें पांच पंचकें राहिलीं जाणोनी सांडीलीं कर्णादिकें
कर्ण प्राण आणि विषयपंचक इंद्रियदशक पंचवीस ११
पंचवीस तत्वें या लिंगदेहाचीं साक्षी वेगळाची अनूभवें
अनुभवें साक्षी स्थूलसूक्ष्माचा जागृती-स्वप्नाचा जाणता तूं
जाणता तूं कोण सांग वोळखण नेणती आपण आपणासी
आपणासी नेणें स्वामीनें सांगावें अज्ञान जाणावें रूप तुझें

---

१ गुरूनें.

तुझें तूंचि बापा नेणें म्हणतोसी तेंचि निश्चयेंसीं रूप तुझें १६
रूप तुझें तूज दृश्य होत आहे नेणपण पाहें साक्षीरूप १७
साक्षीरूपें मज कळेना म्हणसी तो तूं निश्चयेंसी वेगळाची १८
वेगळाचि तोही देहाविलक्षण वर्ततो आपण साक्षीरूपें १९
साक्षिरूपें सर्व पदार्थ जाणता तो कांहीं तत्वता आत्मा नव्हे
आत्मा नव्हे जाण जाणें अंतःकर्ण नाहीं जाणपण आत्मरूपीं २१
आत्मरूपीं मन बुद्धी अगोचर आठव विसर तेथें नाहीं २२
तेथें नाहीं वृत्ती सर्वही निवृत्ती जाणती नेणती वृत्ती बापा २३
वृत्तीरूप आत्मा हें केवीं घडावें तेव्हां वीघडावें निवृत्तीसीं २४
निवृत्ती उन्मनी निःशब्द विज्ञान ऐसें समाधान अनिर्वाच्य
अनिर्वाच्य तेथें नाहीं जाणपण आघुलें आपण पुरातन
पुरातन एक प्रपंच माईक मिथ्याचि अनेक भासमात्र २७
भासमात्र कांहीं नसोनियां आहे वीचारूनी पाहे अनुभवें
अनुभवावीण उठे जाणपण जाणपणें तो सीण वाउगाची २९
वाउगाची सीण करीतसे मन आत्मज्ञान येन म्हणोनीयां
म्हणोनीयां मूळीं अज्ञानची नाहीं तेथें ज्ञान कांहीं वाउगेंची
वाउगेंची ज्ञान मनाची कल्पना निर्विकल्प जाणा कल्पूं पाहे
कल्पूं पाहे मन कल्पना वीषय तरी आत्मा काय विषयी ऐसा
ऐसा नव्हे आत्मा मनासी आकळे मनची मावळे पाहूं जातां
पाहूं जातां ज्यासी क्षय आहे त्यासी म्हणोनी मानसीं अगोचर
अगोचर मना तें कैसें पाहावें मीपणासी ठावें कदा नव्हे ३६

१ हाट.

न व्हे जाण तैसें ऐसेंचि जाणावें मना होय तवें समाधान ३७
समाधान तें तूं वाक्य तत्वमसी सोहं हंस ऐसी मात आहे ३८
आहे अहंब्रम्ह ऐसेंचि वचन ब्रम्ह सनातन तूंचि बापा ३९
तूंचि बापा ब्रम्ह येर सर्व भ्रम दृढ धरीं वर्म अंतरींचें ४०
अंतरींचें वर्म अंतरीं धरावें विचारें करावें दृढतर ४१
दृढतर होय श्रवण मननें अद्वैतची मनें वीचारावें ४२
विचारावें जना भक्तीचें लक्षण वैराग्य तें कोण कैसें आहे
आहे भक्ती कैसी विवेकें जाणावी आवडी धरावी शाश्वताची
शाश्वताची प्रीती विषयीं विरक्ती नाशवंत चित्तीं जाणोनीयां४५
जाणोनीयां सर्व नाशवंत ऐसें शाश्वती विश्वासें मन बुद्धी४६
बुद्धीचा निश्चय स्वरूपीं जहाला प्राणी विश्वासला स्वस्वरूपीं[1]
स्वस्वरूपीं आसक्रिया तेच भक्ती पाहतां विभक्ती जेथें नाहीं४८
जेथें नाहीं देह-बुद्धीचें अज्ञान तया नाव ज्ञान बोलीजेति४९
बोलिजेति ज्ञानें सर्वसाक्षीभूत जाणावें अद्वैत तेंचि ज्ञान५०
ज्ञान आणि भक्ती एकची असती वैराग्याची स्थिती बोलिजेल
बोलिजे वैराग्य त्यागाचें लक्षण साक्षी विलक्षण जाणोनीयां
जाणोनी माईक सर्वही त्यागीलें मन सुखावलें संगत्यागें ५३
संगत्याग केला निःसंग जहाला सर्वही एकला एकरूप५४
एकरूप झालें भक्ति आणि ज्ञान बुडालें साधन वैराग्याचें५५
वैराग्यावांचून सर्व खंडे[2] ज्ञान त्यागाचें लक्षण जेथें नाहीं५६

---

१ आत्मस्वरूपीं. २ अपूर्ण.

नाहीं भक्तिभाव सगुणाचे ठाईं शब्दज्ञान कांहीं बोलोनियां ५७
बोलोनीयां मूखें तैसी कीया करी धन्य तो संसारीं ब्रम्हज्ञानी ५८
ब्रम्हज्ञानी भला वर्तणुके नासी कोरड्या शब्दांसी कोण पुसे ५९
कोण पुसे बाबा ज्ञान हें शाब्दिक क्रिया अलोलीक सत्य जाण
सत्य जाण भक्ती शरीरें करावी आवडी धरावी सगुणाची ६१
सगुणीं आदरें देहा झीजवावें भजन करावें नव वीधा ६२
नववीधा खुण श्रवण कीर्तन नामाचें स्मरण सर्व काळ ६३
सर्वांचें जीवन तें पादसेवन करावें पूजन यथासांग ६४
यथासांग पूजा देव ब्राम्हणांची प्रीती वंदनाची सर्व काळ ६५
सर्वकाळ दास मानसीं आवडे सख्यचि रोकडें सर्वांभूतीं ६६
सर्वांभूतीं मन आत्मनीवेदन ऐसें हें भजन नववीधा ६७
नवविधा भक्ती हा देह चालतां करावी सर्वथा सर्वभावें ६८
सर्वभावें सदां सगुणीं भजावें कोरडें त्यागावें शब्द ज्ञान ६९
शब्दज्ञानें भक्ती संसारीं आसक्ती या नाव विभक्ती सत्य जाण ७०
सत्य जाण मनें आधार घेतला स्रवें स्रवावला विषयासी ७१
विषयाचें सूख चोरूनीं अंतरीं त्याग दुराचारी उच्छेदिती ७२
उच्छेदिती ऐशी भक्ती सगुणाची वाट संधानाची मोडतसे ७३
मोडतो आचार कुळकर्माचार करी भ्रष्टाकार पापरूपी ७४
पापरूपी नर जाणावा साचार करी एकाकार शब्दज्ञानें ७५
शब्दज्ञान गातां अहंतेचा माथा तेणें तो सर्वथा आवरेना ७६
आवरेना तोंडीं धरितां पाषांडी वेदआज्ञा मोडी तोंडवकें ७७

संसारींचें सूख नाशवंत आहे जाइझणे पाहे विचारूनी ८०
विचारूनि पाहें अशक्ती मनाची दुर्दशा ज्ञानाची करूंनको ८१
करूंनको मुक्त कियेचा निश्चय तेणें होतो क्षय साधनाचा ८२
साधन सोडितां सिद्धपण गेलें साधनेंचि भलें सिद्धपण ८३
सिद्धपण आंगीं आदळों न द्यावें जाणपण द्यावें सोडूनियां ८४
सोडूनी जाणीव जाणोनी नेणता सिद्धपणें स्वता साधक तो ८५
साधक तो आहे ब्रम्हा विष्णु हर साधनीं तत्पर सर्वकाळ ८६
सर्वकाळ त्याग करूनी उदास योगी ते तापस दीगांबर ८७
दिगांबर हरू साधनीं सादर त्याहूनियां थोर जीव काय ८८
काय ते चुकले उदासीन झाले त्याहूनि हे भले शब्दज्ञानी ८९
शब्दज्ञानी भला तोचि तो जाणावा स्वयें पालटावा झालेपणें ९०
झालेपणें भाव भजावें सगुणा भक्ती उपासना जप ध्यानीं ९१
जप ध्यान मन भोगीं उदासीन स्वधर्मरक्षण यथाशक्ती ९२
शक्तीहुनी वाड ज्ञान बोलूंनये सोय सांडूनये सगुणाची ९३
सगुणाची सोय सांडूनीं एकदां तीर्थ क्षेत्र सदां आवडावें
आवडावें सदां स्वयें निरूपण श्रवण मनन निजध्यास ९५
निजध्यास होय अंतरींचा त्याग बाह्यें वीतराग उदासीन ९६
उदासीन वृत्ती कोठें गुंडाळेना उपाधी जोडेना बाह्याकारीं
बाह्यें अभ्यंतरीं त्याग निरंतरीं वैराग्य यापरी आचरावें ९८

निरूपणीं सत्य तेंचि प्रतिष्ठावें मग आचरावें यथाशक्ती १०१
शक्ती सार स्वयें जैसा आचरतो तेंचि प्रतिष्ठीतो मूढजन १०२
मूढजन तरे साधनीं लावितां पाविजे अनंता भक्तीपंथें १०३
भक्तिपथें जातां होय सायुज्यता वाक्य हें तत्वता दास म्हणे

# सगुणानिर्गुण संवाद शतक.

करीं चाप बाण माहेश्वरीं शाण रूप हें सगुण राघवाचें १
राघवाचें रूप निर्गुण जाणावें सगुण स्वभावें नाशवंत २
नाशवंत देव कदां म्हणोनये निर्गुणासि काये पाहाशील ३
पाहातां निर्गुण देवासीं दुर्लभ त्याचा होय लाभ पूर्वपुण्यें ४
पूर्वपुण्यें लाभ ब्रम्हादिकां झाला कैवारी जोडला रामचंद्र ५
रामचंद्र नाम रूप हें माइक बोलिला विवेक वेदशास्त्रीं ६
वेदशास्त्रीं भक्ती राघवाची सार तेणें पैलपार पाविजे तो ७
पाविजे तो पार आत्मनिवेदनें भक्तीचीं लक्षणें नवबीध ८
नवविधा भक्ती करितां तरले जीव उद्धरले नेणों किती ९
नेणोनियां देव मायीक भजतां मुक्ती सायुज्यता अंतरली १०
अंतरली मुक्ती भक्तिमार्गें धांवें राघवाचीं नावें नीरंतर ११

संतजन-संगती चुके अधोगती राम सीतापती ज्याचें नाम १३
नाम ज्याचें घ्यावें त्यास ओळखावें देवासी धुंडावें आदरेंसीं
आदरेंसीं जपे रामनामवाणी स्वयें शूळपाणी महादेव १५
महादेवें गुरू-गीता निरूपीली तेथें मन घालीं आलीया रे
आलीया संसारीं रामनाम तारी दुजें पृथ्वीवरी आढळेना १७
आढळेना परी संतसंग धरीं तेणें तूं अंतरीं निवसील १८
निवालें अंतर रामासी भजतां दुजें कांहीं आतां आवडेना १९
आवडेना जया संतांची संगती तया अधोगती गर्भवास २०
गर्भवास माझे राम चुकवील मज सोडवील अनाथासी २१
अनाथाचा नाथ पतीतपावन तया संतजन दाखवीती २२
दाखवीती संत वाटे नीचधामीं माझें मन रामीं विश्वासलें २३
विश्वासलें परी रामासी नेणवे तो राम जाणवे संतसंगें २४
संतसंग करीं निःसंग होईजे मग तो जाणीजे राम केवीं २५
रामासीं मिळतां संतांचे मिळणीं मग दुजेपणीं उरी नाहीं २६
उरी त्या रामाची जन्मीजन्मीं असे मन हें विश्वासे रामपायीं
रामपायीं मन होतसे उन्मन तेथें भिन्नाभिन्न ऐक्यरूप
ऐक्यरूप ज्ञान तें मज नावडे गाईन पवाडे राघवाचे २९
राघवासी गूण नाहीं तो निर्गुण गाई पडे खूण संतसंगें ३०
संतसंगतीचा निर्गुणसंवाड मज वाटे गोड रामकथा ३१
कथानीरूपण श्रवण मनन होय समाधान संतसंगें ३२

[illegible]
सांभाळीतो काय प्रारब्धावेगळें  होणार न टळे ब्रम्हादीकां ३६
ब्रम्हादीकां मान्य तो नव्हे सामान्य  असावें अनन्य सगुणासीं
सगुणासी ठाव उरेना कल्पांतीं  म्हणोनी सांगती संतजन ३८
संतजन ज्ञानी पूर्ण समाधानी  तेही जपध्यानीं सर्वकाळ ३९
सर्वकाळ ध्यान करिति सज्जन  परी तें निर्गुण ध्यान त्यांचें
ध्यानीं आकळेना मनासी कळेना  तयासी कल्पना केवीं धरीं ४१
धरीला विश्वास साधुचे वचनीं  अवस्था उन्मनी तेणें गुणें ४२
गुणेंची निर्गुण कळे सर्व खूण  म्हणोनि सगुण देव धरी ४३
धरावा सगूण निर्गुणाकारणें  तया विण येथें चाड नाहीं ४४
चाड नाहीं ऐसें कासया म्हणावें  सगुणें पावावें निर्गुणासी ४५
निर्गुणासी पावे निर्गुणाकरितां  सगुण पहातां तेथें नाहीं ४६
नाहीं कां म्हणसी सद्गुरू सगूण  आणि निरूपण बहूवीध ४७
बहुविध रूप नव्हे सद्गुरूचें  निर्गुण बा याचें जाण बापा ४८
जाण आतां बापा तूं तरी सगुण  झालासी शरण सद्गुरूसी ४९
सद्गुरूसी गेला जो कोणी शरण  तयासी सगुण कोण म्हणे ५०
म्हणसील काय सगुणावांचोनी  सर्वही करणी सगुणाची ५१
सगुणाची नव्हे निर्गुणाची सत्ता  निर्गुण करितां सर्व झालें
सर्व झालें जेव्हां निर्गुणाकरीतां  तेव्हां सगूणता निर्गुणाची ५३

निर्गुणाची लीला वांझेची कुमारी बोलतां अंतरीं मानीजेना ५४
मानीजेना तरी सृष्टीस रचीलें सर्व कोणें केलें तयावीणें ५५
तयावीणें दूजें काय सत्य आहे अनुभवें पाहे आपूलीया ५६
आपुला विचार निर्गुणीं सर्वदा निर्गुणासी कदा वीसंबेना ५७
विसंबेना घडे सत्संग नसतां संग विचारीतां सगूण कीं ५८
सगुणाचा संग ज्ञानीयासी नाहीं ज्ञानीया विदेही पुरातन ५९
पुरातन देही तरीच विदेही देहावीण नाहीं विदेहता ६०
विदेहता बोल स्वभावें लागली निर्गुणाची खोली कोण जाणे ६१
जाणे सुख दुःख जाणे गुणागुण तयासि निर्गुण बोलवेना ६२
बोलवेना परी निर्गुण कळावें विवेकें मिळावें निर्गुणासी ६३
निर्गुणीं सगुणीं मिळतां संकट व्यर्थ खटपट कां करीसी ६४
कां करीसी भक्ती सगुणादेवाची तुज निर्गुणाची ऋद्धी नाहीं
ऋद्धी नाहीं झाली जया आनंदाची तयां विवादाची उरी नाहीं
उरी नाहीं कदा निर्गुणीं भजतां निर्गुण तत्वतां सार आहे ६७
सार तें साकार भक्तीचा निर्धार भक्ती पूर्वापर सगुणाची ६८
सगुणाची भक्ती अज्ञानें धरावी सज्ञानें करावी निर्गुणाची
निर्गुणाची भक्ती या नाव अभक्ती अव्यक्तासी व्यक्ती लावूं नये
लावूंनये भाव सगुणदेवासी व्यर्थ पाषाणासी काय काज ७१
काज कारण हा विवेकें पाहीजे भावार्थे लाहीजे सर्व कांहीं ७२
सर्व कांहीं नाहीं जैसें मृगजळ वायां खळबळ कां करीसी ७२

---

१ साकारता देह.

कां करीसी सर्व देहाचा संबंध जरी झाला बोध निगुर्णाचा ७४
निर्गुणाचा बोध संसार निरसी[1] तेथें अज्ञानासी रीघ नाहीं ७५
रीघ नाहीं जया भावार्थ भजनीं तया हृदयधुनी शून्याकार ७६
शून्याकार होय विवेकवासना मग समाधाना काय उणें ७७
उणें झालें दूणें निर्गुणाच्या गुणा अभावीकां कोणें उद्धरावें ७८
उद्धरावें एका सज्जनासंगती ऐसें वेदश्रुती बोलताती ७९
बोलताती परी नाहीं आठवण म्हणोनी सगूण आवडेना ८०
आवडेना मिथ्या मायीक भजन असत्यासी मन विश्वासेना
विश्वासेना मन सगुणासी जरी तयासी कैवारी देव कैंचा ८२
कैंचा देवभक्त कल्पना आपूली ते सर्व नाथीली ज्ञानीयांसी
ज्ञानीयांसी देव दुरी अंतरला संदेहीं पडला अंतकाळीं
अंतकाळ कैंचा अनंत ठाईंचा संदेह देहाचा मिथ्याभूत
मिथ्याभूत शब्दज्ञानें मायाजाणा अभक्त तरेना मायापूरीं
मायामोहपूर दुस्तर संसार अद्वैतविचार जंव नाहीं ८७
जंव नाहीं भावें श्रीहरी अर्चीला तंव नव्हे भला ज्ञानगर्वी ८८
ज्ञानगर्वी नव्हे ज्ञान त्या दुर्लभ जयाचेनी लाभ स्वरूपाचा ८९
स्वरूप रामाचें मनीं आठवावें नाम उच्चारावें रात्रंदिवस ९०
दिवसा ना रजनीं मनीं ना उन्मनी ज्ञाता जनीं वनीं सारिखाची
सारिखाची भाव तया भेटे देव येर सर्व वाव शब्दज्ञान ९२
ज्ञानावीण सर्व व्यर्थचि जाणावें जंव नाहीं ठावें आत्मज्ञान

१ नाशी.

संतसंग जरी सगुणी-भजन स्वधर्मसाधन क्रिया कर्म ९६
क्रिया कर्म कैंचें ज्ञानीयाचे अंगीं मुक्त ज्ञानी जगीं विचरती ९७
विचरीजे हेंहीं तों कीजे सर्वही क्रीया कर्म काहीं सांडूं नये ९८
सांडूं नये भक्ती स्वधर्मविरक्ती ब्रम्हज्ञानप्राप्ती रामदासीं ९९
रामदास म्हणे रामउपासका भक्ति सोडूं नका राघवाची १००

## भक्तिपर अभंग.

### पंचक.

भक्ति नलगे भाव नलगे देव नलगे आम्हांशि १
आम्ही पोटाचे पाईक[1] आम्हा नलगे आयीक २
आम्ही खाऊं ज्यांची रोटी त्यांची कीर्ती करूं मोटी ३
रामीं रामदास म्हणे ऐशीं मूर्खाचीं लक्षणें ४

१

आम्हा अन्न झालें पुरें अन्नावीण काय उरे १
पोटभरी मिळे अन्न आम्हा तेंचि ब्रम्हज्ञान २
अन्नावांचूनी दूसरा देव आहे कोण खरा ३
भगवंताची नाहीं गोडी काय म्हणे ते बापुडी[2] ४

१ चाकर. २ शरीर.

अन्न व्हावें पोटभरी मग तें ज्ञान चर्चा करी १
ऐसें बोलती अज्ञान जांसि नाहीं समाधान २
आधीं अन्न तें पाहिजे मग ध्यानस्थ राहिजे ३
अन्नावीण तळमळ अन्न करीतें सकळ ४
कैंचा राम कैंचा दास अवघे पोटाचे सायास ५

३

अन्न देणार श्रीहरी तोचि प्रतीपाळ करी १
ज्या देवाचे आज्ञेवरी मेघ वर्षती अंबरीं २
तयासि चुकलीं बापुडीं अन्न अन्न करिती वेडीं ३
रामदास म्हणे एक आदि अंतीं देव एक ४

४

देव तारी देव मारी देव सर्व कांहीं करी १
अन्नोदक देवें केलें सर्व तेणेंचि निर्मिलें २
तयासि चुकलीं बापुडीं अन्न अन्न करिती वेडीं ३
रामदास म्हणे एक देव त्रैलोक्य-नायक ४

५

देव घालितो संसारीं देव सर्व कांहीं करी १
लक्ष चौऱ्यांशी हिंडतां तेथें देव सांभाळिता २
तयासि चुकलीं बापुडीं अन्न अन्न करिती वेडीं ३

---

१ दीनपणानें.

देव एका भाग्य देतो  एका भीकेसि लाविता १
न कळे भगवंताचें करणें  राव रंक तत्क्षणें २
तयासि चुकलीं बापुडीं  अन्न अन्न करितीं वेडीं ३
रामदास म्हणे पाहीं  देवावीण कांहीं नाहीं ४

७

माया लाविली माईक  आदि अंतीं देव एक १
देव संकटीं पावता  देव अंतीं सोडविता २
तयासि चुकलीं बापुडीं  अन्न अन्न करितीं वेडीं ३
रामदास नवल परी  देव सर्वांचे अंतरीं ४

८

क्षुधा लागतांचि अन्न  तृषा लागतां जीवन १
निद्रा लागतां शयन  आळस येतां चूके मन २
मळमूत्र संपादणें  शौच्य आचमन करणें ३
खाणें लागे नानापरी  सर्वकाळ भरावरी ४
अवघा धंद्याची लागला  दिवसें दिवस काळ गेला ५
रामीं रामदास म्हणे  देह सुखाडा[1] करणें ६

९

हात धुणें पाय धुणें  नाना उपचार करणें १
सर्वकाळ लोभासंगें  करणें लागे हो अभ्यंगें[2] २

---

१ सुखाचें आगर. २ बुरें.

अवघा धंदाची लागला दिवसेंदिवस काळ गेला ५
रामदास म्हणे हित कैसें घडावें स्वहित ६

१०

सीतकाळींच हूताश[1] उष्णकाळीं वारा वास १
आले पर्जन्याचे दिवस केले घराचे सायास २
नाना व्याधीचीं औषधें पथ्य करावें निरोधें ३
विषयीजनासी आदर करणें लागे निरंतर ४
अवघा धंदाची लागला दिवसेंदिवस काळ गेला ५
दास म्हणे सांगों किती ऐसी देहाची संगती ६

११

धनधान्याचें संचित करणें लागे सावचित्त १
अर्था जातो एकला रे कलह करावे आदरें २
नानापशूनें पाळावीं नानाकुळें सांभाळावीं ३
सार विचार जतन करणें लागे सावधान ४
अवघा धंदाची लागला दिवसेंदिवस काळ गेला ५
रामदास म्हणे देवा जीव कीती हा घालावा ६

१२

पोट-धंदा जन्मवरी करूं जातां नाहीं पुरी १
करितां संसारीं सायास नाहीं क्षणाचा अवकाश २

---

१ अग्नि.

अवघा धंद्याची लागली दिवसादिवस काळ गेला ५
दास म्हणे सावधान झालें सदृढ बंधन ६

१३

शिंक जांभई खोकला तितुका काळ व्यर्थ गेला १
आतां ऐसें न करावें नाम जीवीं तें धरावें २
श्वास उश्वास निघतो तितुका काळ व्यर्थ जातो ३
पोंत्या घातें नलगत तितुकें वय व्यर्थ जात ४
लागे अवचित उचकी तितुकें वय काळ लेखी ५
म्हणे रामीं रामदास होतो आयुष्याचा नाश ६

१४



# कलियुग

## पंचक.

आलें भगवंताच्या मना तेथें कोणाचें चालेना १
जैसा कलि राजा आला धर्म अवघाची बुडाला २
नीति मर्यादा उडाली भक्ति देवाची चुकली ३

---

१ डोळ्याच्यापात्यास.





विप्रीं सांडिला आचार क्षत्री सांडिला विचार १
मेघ-वृष्टी मंदावली पिकें भूमीनें सांडिलीं २
बहुवृष्टी अनावृष्टी दास म्हणे केली सृष्टी ३

२

लोक दोष आचरती तेणें दोषें भस्म होती १
जनीं दोष जाहले फार तेणें होतसे संहार २
रामदास म्हणे बळी दिसे दीसे पापें कळी ३

३

माहीं पापाचा कंटाळा येतो हव्यास आगळा १
जना सुबुद्धी नावडे मन धांवे पापाकडे २
रामी रामदास म्हणे पुण्य उणें पाप दुणें ३

४

पुण्य क्षेत्रें तीं मोडावीं आणि ब्राम्हणें पीडावीं १
पुण्यवंत ते मरावे पापी चिरंजीव व्हावे २
रामदास म्हणे वाद विघ्नें येती धर्मआड ३

५

लोक भीणेंचि चालती त्यांसि होताती विपत्ती १
धर्मप्रवृत्ती बुडावी शास्त्र मर्यादा उडावी २
रामदास म्हणे देवें बौध्द होऊनी बैसावें ३

६

येथें काय रे वाजतें कोठें काय गजबजतें १
उगा करीती कोल्हाळ माझें उठलें कपाळ २
हाका मारूनि वरडती टाळ अवघेची कुटिती ३
कोठें कैंचे आले लुटे वायां झाले टाळकुटे ४
वेडीं संसार सांडिला व्यर्थ गलबला मांडिला ५
दास म्हणे या मूर्खाला हरीकथेचा कंटाळा ६

१

हरिकथेचा आला राग खेळ होतां घाली त्याग १
ऐसे प्रकारचे जन नाहीं देवाचें भजन २
कळावंताचें जो गाणें ऐकतांची जीवभानें ३
करिति लग्नाचा उत्साव[1] नाहीं देव महोत्सव ४
भूत-दया नाहीं पोटीं खातीं लोभाचीं चोरटीं ५
रामीं रामदास म्हणे देव धर्म कोण जाणे ६

२

स्वार्थ केला जन्मवरी लोभें राहीलों श्रीहरी १
धन धान्य अहर्निशीं गाइ महिषी घोडे दासी २
शेत वाडे घर दावें पाणी जीवीं धरी होवो ३
माता पिता बहिणी भ्राता कन्या पुत्र आणी कांता ४

---

१ महा-उत्साह-मोठा उत्साह. २ हव्यास.





३

जन्मवरी शीण केला अंतकाळीं व्यर्थ गेला १
काया स्मशानीं घातली कन्या पुत्र[1] मुरडलीं २
घर वाडा तो राहिला प्राणी जातसे एकला ३
धन धान्य तें राहिलें प्राणि वर्फडित गेले ४
इष्ट मित्र आणि सांगाती आपुलाले घरा जाती ५
दास म्हणे प्राणी मेले कांहीं पुण्य नाहीं केलें ६

४

दैन्यावाणा झाला प्राणी चंद्री लागली नयनीं १
म्हणती ऊचला ऊचला आतां भूमी भार झाला २
घीर लागला अमूप प्राणि झाला बेनरूप ३
दांतखिळ बसली वाणी ताठा भरला कर-चरणीं ४
डोळे विक्राळ दीसती झांका झांका मूलें भीती ५
रामीं रामदास म्हणे अवघीं सुखाचीं पीसुनें ६

५

एक म्हणती कां पळावें एक म्हणती कां बैसावें १
लोक बोलती सत्तरें काय मानावें तें खरें २
एक म्हणती कां सोडावें एक म्हणती कां मोडावें ३
दास म्हणे हो तत्वता जाण अवघी बाष्कळता ४

६

१ परतली २ कुत्रीं

नाहीं ज्ञानाचा विचार केला अज्ञानें संचार १
मना आलें तें बोलती चालों नये तें चालती २
अवघा स्वधर्म बुडाला देह प्रपंचीं लाविला ३
रामीं रामदास म्हणे अविद्येचीं हीं लक्षणें ४

७

स्नान नाहीं संध्या नाहीं देव नाहीं धर्म नाहीं १
उगाच बसुनीयां घरीं सज्जनाची निंदा करी २
तीर्थ नाहीं क्षेत्र नाहीं दान नाहीं पुण्य नाहीं ३
तप नाहीं शास्त्र नाहीं मंत्र नाहीं गायत्री नाहीं ४
पोटीं नाहीं निस्पृहता नाहीं विद्येनें पूरता ५
रामदास सांगे खुणे पापि सर्वांपरी उणे ६

८

कपटी कुटिळ आळसी घरीं मिळेना खायाशी १
उगाच धरितसे ताठा पापि दरिद्री करंटा २
पोरें म्हणति काय खावें स्त्रिया म्हणती कोठें जावें ३
रामीं रामदास म्हणे अवघीं हासती पीसुनें ४

९

स्वयें आचरावें पाप विशेष निंदा वज्रलेप १
निद्रा मत्सर टवाळी मायबापाशीं ढवाळी २
अनाचारी परद्वारी मना आलें तेंचि करी ३
रामीं रामदास म्हणे असे जिताची मरणें ४

गळां बांधिला पाषाण आत्मलिंग जाणे कोण १
जिवाशिवाचें स्वरूप कोण जाणे कैसें रूप २
लिंग चुकलें स्वयंभ धरि पाषाणाचा लाभ ३
रामीं रामदास म्हणे भेद जाणती ब्राह्मणे ४

१

पृथ्वी अवघी लिंगाकार अवघा लिंगाचा विस्तार १
आतां कोठें ठेऊं भाव जेथें तेथें महादेव २
अवघा देव विस्तारला ऐसें देवचि बोलिला ३
रामदासा विसरला अवघा देवचि भरला ४

२

एकविस स्वर्ग विस्तारला देव संपुष्टीं घातला १
केलें देवासी बंधन तेंचि पावला आपण २
देव ठायींचा अनंत त्यासि म्हणती अंतवंत[१] ३
रामदास म्हणे भावें जैसें द्यावें तैसें घ्यावें ४

३

अंत नाहीं तो अनंत त्यासि दोरी करी भ्रांत १
ऐसें जनाचें करणें कैसा संसार तरणें २
देव व्यापक सर्वांसी त्यासि म्हणती एकदेशी ३

१ नाशवंत.

रामदासीं देव पूर्ण । त्यासि म्हणती अपूर्ण ४

४

देव पाषाण भाविला । तोचि अंतरीं दाविला १
जैसा भाव असे जेथें । तैसा देव वसे तेथें २
दृश्य बांधोनीयां गळा । देव जाहला नीराळा ३
दास म्हणे भावातीत । होता प्रगटे अनंत ४

५

अवघे पाषाण मांडिले । कोण म्हणती आपुलाले १
सर्व घटीं देव एक । भेदें भाविला अनेक २
देव निर्मळ निश्चळ । पाहति पाषाणाची खोळ ३
रामदासाचें अंतर । देवापासीं निरंतर ४

६

धान्य अवघेंचि दाकिती । बळ देखतां तोंडीं माती १
देव सर्वांचे अंतरीं । सोडुं जातां तैसी परी २
तूप सांडुनी आपण । खाऊं पाहे साठवण ३
दास म्हणे ते राउळा । सोडुन पूजिती देउळा ४

७

साठवणेंवीण धान्य । धान्येंवीण साठवण १
एकावीण एक काय । कामा नये वाया जाय २
ज्ञानें-वीण उपासन । उपासनेवीण ज्ञान ३
रामीं रामदासावीण । करी नुसेंचि भजन ४

८

## अभिमान
### पंचक.

संसाराचें दुःख आलें  गाणें अवघेंचि बुडालें १
आतां आठवेना कांहीं  पडिलों चिंतेच्या प्रवाहीं २
गाणें नाचणें सुखाचें  जिणें जहालें दुःखाचें ३
म्हणे रामीं रामदास  कोण करीतो सायास ४

१

नाना प्रकारीचें गाणें  मीच बाळ-पणीं जाणें १
काय जहालें कळेना  एक तेंही आठवेना २
मज पालटर होतें  तिळुकें कोणाशिं नव्हतें ३
रामदास म्हणे आतां  जीव जहाले दुश्चिता ४

२

वोढवलें पूर्व-पाप  नानाप्रकारें संताप १
तेणें ऋद्धीच उडाली  नीति अवघीच बुडाली २
केली क्रीया ते कळेना  मन विवेकें वळेना ३
भरीं भरलेंसे मन  अवघें तेचि ते कारण ४
झोंबे विकल्पाचें श्वान  देहबुद्धी घेत शन ५
रामीं रामदास म्हणे  अवघीं झालीं कूलक्षणें ६

३

सात पांच गाय-वाट  अवघा एकचि चौहाट १
तेथें कोणेकडे जावें  अवघीं याटचि स्वभावें २

# उन्मत्त
## पंचक.

रामीं विसरला प्राणी कामलोभें केली हाणी १
कामधेनु मोकलीली घरीं गाढवी बांधिली २
उपडूनी कल्पतरू केला शेराचा आदरु ३
सांडुनीयां चिंतामणी वेंची धड्यराचें पाणी ४
गेलें हातिचें नीधान केलें कवडीचें साधन ५
परिसा[1] रागें हुंडोरिला[2] हातीं पाषाण घेतला ६
सार अमृत सांडिलें दैन्यवाणें कांजी प्यालें ७
सोनें सांडुनी आदरें वेंचूं लागला खापरें ८
रत्न सांडुनीयां खडे गेले म्हणुन दुःखें रडे ९
केली साखर परती सुखें तोंडीं घाली माती १०
म्हणे रामीं रामदास तोडी संसाराची आस ११

१

१ चिंतामणीला . २ दकलुनदिलें .

विवेक-गुरु तो मारिला [illegible] ३
नीति-अमृत सांडिलें असत्य-मद्य-पान केलें ४
दया-बहिण संहारिली निंदामातंगी पाळिली ५
पुत्रविचार दवडीला हासिपुत्र प्रतिष्ठिला ६
सत्य-ब्राम्हण मारिला दोषी ढीवर पाळिला ७
ज्ञान-पक्वान्न सांडिलें माष-अज्ञान सेविलें ८
भक्ती-लक्ष्मी त्यागीली अभक्ति-अवदसा घेतली ९
मित्र-विश्वास सोडिला शत्रु-विकल्प जोडिला १०
भेद चोरटे पाळिले अभेद-राजे दुराविले ११
रामीं रामदास म्हणे जळो अभक्ताचें जिणें १२

२

जेणें संसारीं घातिलें पापी त्यासी विसरले १
श्रीसी सांडोनीयां दारा भजे दासीचा डिंगरा २
मायबाप दूरावली चोरें आपुली मानिलीं ३
फोडोनीयां शाळीग्राम वेश्या सेवीतो अधम ४
रामीं रामदास म्हणे जळो अभक्तांचें जिणें ५

३

ज्याच्या उदरासि आला त्यासि फिरोनि पडला १
तोचि जाणावा चांडाळ देव ब्राम्हणाचा काळ २
झाला स्त्रियेसी लंपटु माय-बापासि उद्धटु ३

रामीं रामदास म्हणे  यम केला त्याकारणें  ६

४

प्राणी संसारासी आला  परि तो देवासी चूकला  १
तणें तोचि तो अज्ञान  नेणे भगवंताचें ज्ञान  २
देह आपुला मानिला  देवीं सांडोनीयां गेला  ३
जें जें कांहीं अशाश्वत  तें तें मानीलें शाश्वत  ४
देवीं ब्राम्हणीं अभाव  तेथें वर्णागाचा भाव  ५
रामदासाचें स्वहित  जेणें मानिलें अनहित  ६

५



## आळस

## पंचक

श्रोतिं व्हावें सावधान  मना आलें तें गाईन  १
ताल जाती एकीकडे  माझें गाणें भलतीकडे  २
दोंडा मूळ तें न कळे  माझें गाणेंचि मोकळें  ३
रामीं रामदास म्हणे  जेणें गुंतती शाहाणे  ४

१

राग मूर्छना कळेना  ताळ ध्रुपद वळेना  १

भक्ति ज्ञानाचा विश्वास  नाहीं म्हणे रामदास  ४

२

निरूपणीं जागवेना  काम क्रोध त्यागवेना  १
इतुक्या-वेगळें साधन  सांगा अपर्वेची करिन  २
आतां करवेना अभ्यास  तोडवेना आशा-पाश  ३
रामीं रामदास म्हणे  राम-नाम उच्चारणें  ४

३

आम्हीं देवाचे आळशी  कांहीं नकळे आम्हाशीं  १
गोड गोड हो जेवणें  आठ-दिवसां एक नाहाणें  २
मऊ पलंग सुषुप्ति[1]  निद्रा पाहिजे पूरती  ३
दास म्हणे लोभाविणें  करूं संक्षेप भांडणें  ४

४

आम्हीं भगवंताचे भोळे  बाह्य अंतरीं मोकळे  १
क्रोध आला तो साहवेना  उणें उत्तर पहावेना  २
आम्हां बोलों सके कोण  बोलासाठीं वेंचूं प्राण  ३
दास म्हणे नीचोत्तरीं[3]  दुःख वाहूं जन्मवरी  ४

५

आम्ही भगवंताचीं वेडीं  नेणों बोलाची परवडी[4]  १
आम्हां ध्यावें ऐसें कळे  फिरोनि द्यावें हें नकळे  २

---

१ निद्रेविषयीं. २ साशंकित. ३ नीच-उत्तर-वाईटभाषणानें. ४ पूर्णता.

दास म्हणे सांगों किती लोक पाठींच लागती ५

५

पहा कलियुगाचे जन कैसे अवघेच दुर्जन १
आप्त म्हणे मारूं जातां त्यास वाटे परम-व्यथा २
पाय देतां मानेवरी सुखें डोळेची वटारी ३
रामदास म्हणे मूर्ख नेणे पराव्याचें दुःख ४

६



## बंधन
### पंचक.

सर्वकाळ शेंडा मूळा येत जातसे मुंगळा १
तैशा कां करिसि येरझारा शरण जावें रघुवीरा २
हातीं धरुनियां सूत खालीं वरती येत जात ३
दास म्हणे जळावरी जैसि फिरती कीं भिंगोरी ४

१

पायीं लाउनीं दोरी भोंगा बांधीला लेकुरीं १
तैसें पावसी बंधन मग तुजला सोडिल कोण २
एक धरोनि बानर हिंडवीति दारोदार ३

रामदास म्हणे पाहें  रीस धापा देत आहे  ४

२

नको करूं अभिमान  होणार तें देवाधीन  १
बहु द्रव्यानें भुलले  काळें सर्वहि ग्रासीले  २
जे म्हणती मी शक्त  तेणें जहाले आसक्त  ३
रामदास सांगे बाट  कैसा होईल शेवट  ४

३

डोळां अज्ञान झांपडी  पायीं देहबुद्धी बेडी  १
असे अज्ञान पशु-जना  जुंफियेले संसारघाणा  २
खांदीं ओझें विषयाचें  पाठिं फटके सुखदुःखाचें  ३
रामी रामदास म्हणे  व्यर्थ गेलें त्यांचें जिणें  ४

४

आलें संसाराचें ज्ञान  तेणें झालें समाधान  १
सकळ-साराचेंहि सार  ऐसा माझा हा संसार  २
कैंचा देव कैंचा धर्म  तीर्थयात्रा कैंचा भ्रम  ३
कैंचें ज्ञान कैंचें ध्यान  अन्न हेंचि समाधान  ४
व्यर्थ गेला रे लौकिकीं  येणें पोट भरेना कीं  ५
रामीं रामदास भले  आम्हा सौख्य हो मानलें  ६

५

कल्पनेचे बरोबरी  मन सर्वकाळ करी  १
स्वप्न सत्यचि वाटलें  दृढ जीवेंसीं धरिलें  २

अवघा माईक विचार नानामंदीर सुंदर ३
तोचि मानिला साचार दिव्यांबर मनोहर ४
जीव सुखें सुखावला थोर आनंद मानिला ५
रामदास म्हणे मंद लिंगदेहाचा आनंद ६

६

कांहीं कळेना विचार अवघा झाला शून्याकार १
उमजेना संसारिक आठवेना परलोक २
अंध विवरीं पडियेले अंधकारीं सांपडले ३
मायाजाळें गुंडाळले वासनेनें वेंटाळिले ४
कामक्रोधें जाजावले[1] मद-मत्सरें पीडिले ५
रामीं रामदास म्हणे अज्ञानाचीं हीं लक्षणें ६

७

अंध अंधारीं बैसले त्यांसि हातें पालविलें १
त्यांसि कळेना कळेना त्यांचि वृत्ती निवळेना २
संतसंगाचें बोलणें संसारीक काय जाणे ३
म्हणे रामीं रामदास केला नसतां अभ्यास ४

८

केला संसार-अभ्यास झाला आयुष्याचा नाश १
सदा उठतां बसतां रामाविण केली चिंता २
नाहीं सापेक्षाचा वेग उगाच मांडीला उद्योग ३

---

[1] खवळले.

रामीं रामदास म्हणे ऐसें जीतचि मरणें ४

९



## पराधीन पंचक.

मुंगसाचे कानीं वाळी मुंगुस हिंडे आळो आळी १
तरि तें पाळिलें जाणावें पराधीनचि स्वभावें २
घेडे आलेसे पाहुणे तरिते जगाचे मेहुणे ३
कार्यकर्ता कीर्तिवंत त्यासि जाणती समस्त ४
कार्यकर्ता तो झांकेना वेध लावी विश्वजना ५
दास म्हणे कुटुंबाचा तोचि पुरूष दैवांचा ६

१

नीज सलगीचे जाणेना पुढें कोणासी मानेना १
आळसी निकामी माणुस पुढें होत कासावीस २
उगेंच नाचतें मुरडतें कोण पुसतें तयातें ३
आपणास अवकाळिलें ज्याचें त्यास कळों आलें ४
आधि कष्टावें रगडावें कार्य बहुतांचें करावें ५
बहुतांसि मीळोंजाणे त्यासि मानीति शहाणे ६
बहुतां मनाला तो त्याख वरकड जाणावे नत्याख ७
आहे प्रगट उपाय दास म्हणे सांगों काय ८

२

असता परधन-वेड काय नाथिले बापुडे ३
शहाणे उदंड कष्टती वडिल उपकारें दाटती ४
बहुत राखिले लौकिक त्यांचें जीणें अलोलिक ५
ज्यास त्यास पाहिजे तो जनीं वाटयास येतो ६
मनोगत जाणे सूत्रें जेथें तेथें जगमित्रें ७
न सांगतां काम करी ज्ञान उदंड विवरी ८
स्तुती कोणाची नकरी आणिमाचा लोभ करी ९
कदा विश्वास मोडीना कोणी माणूस तोडिना १०
जनीं बहुतचि साहतो कीर्तिरूपेंचि राहतो ११
दास म्हणे नव्हे दुःखी आपण सुखी लोक सुखी १२

३

आळसें पिंडाचें पालन परि अवघें नागवण १
देह केलें तेसें होतें वंचले जे करिना तें २
शक्ति आहे तों करावें विश्व कीर्तीनें भरावें ३
पुण्यवंत तो सायेपी आळसी महालोकीं पापी ४
आपलाचि घात करी सदा कठोर वैखरी ५
माणुस राजि राखों नेणे त्यासि न मानीति शहाणे ६
गुणें माणुस भोगतें अवगुणें धीतें जातें ७
दास म्हणे भला भला जेथें तेथें पवाडा केला ८

४

फंदर आळसाची बाईल पुढें काळ रे खाईल १
ज्याचे वडिल आळसी कोणें सिकवावें तयासी २
घरीं खावया ना जेवाया नाहीं लेया ना नेसाया ३
पती उदंडची खाती आळसी उपवासी मरती ४
दास म्हणे सांगों काय होतां अगट उपाय ५

५

ऐसें कैसें रे भजन करिताती मूर्खजन १
गधड्यासि नमन केलें तेणें थोबाड फोडिलें २
उंच नीच सारिखेची दास म्हणे होत छीछि ३

६



## मलिन पंचक.

महादर्पण[1] खंतलें तेयें मुख आछादलें १
तैसी वृत्ती हे मळिन होतां बुडे समाधान २
धातुवरी आला मळ तेणें लोपलें निर्मळ ३
श्रोतीं न जातां आडत तेणें आछादलें श्रोत ४
मुखें न होतां उच्चार तेणें बुडे पाठांतर ५
नाहीं दीपाचा विचार दास म्हणे अंधकार ६

१

1 अतिशय मळानें भरलें असें.

नाना-देवा केले जनीं  अनुताप आला मनीं  ३
रामीं रामदास म्हणे  जया स्वहीत करणें  ४

२



## प्रस्ताविक

### पंचक-

डोळे चिरींव चांगले  वृद्धपणीं सरक्या झाले  १
ओले मातीचा भरंवसा  काय मानीसी माणसा  २
मुख रसाळ चांगलें  पुढें अवघें सुकूतलें  ३
रम्य नासीक सरळें  सर्वकाळ पाणी गळे  ४
कर्ण-भूषणें सुंदर  पुढें जहालीं बधिर  ५
बरवी दंतांची पंगती  परि ते उन्मळोनि पडती  ६
बरवे कर आणि चरण  परि ते झाले निष्कारण  ७
अंग-कांती होती बरी  झाली चिरगुटाचे परी  ८
केश होताती पांढरे  लाळ गळतां ना धरे  ९
बहुसाल होतें बळ  पुढें जहालें निर्बळ  १०
देह होतें जें निर्मळ  तेंचि झालें अमंगळ  ११
सर्व तारुण्यें चांगला  आणि हीनरूप झाला  १२

थोंटे पांगुळे बधिर आतां तरी होती नर १
नाहीं देहाचा भरंवसा वारण जावें जगदीशा २
कोड कुश्चळ सर्वांगीं एक झाले क्षयरोगी ३
एक डायी अंध होती एका समंध लागती ४
नाना-रोगाचे उमाळे काय होईल नकळे ५
रामदास म्हणे भावें वेगीं सार्थक करावें ६

२

वेगीं व्हावें सावधान ऐसें आहे वृद्धपण १
डोळे जाती कान जाती दांत अवघेचि पडती २
हात गेले पाय गेले देह पाझरों लागले ३
दास म्हणे वाकी गेली मती अवघीच खुंटली ४

३

ऐसें आहे सर्व कांहीं चिरंजीव कांहीं नाहीं १
युक्ती जात्ये बुद्धी जात्ये क्रिया तेही पालटत्ये २
धीर विचार बुडाला होता विवेक तोही गेला ३
रामीं रामदास म्हणे वृद्धपणाचीं लक्षणें ४

४

अंतीं एकलाची जावें म्हणोनी राघवीं भजावें १
माता पीता बंधूजन कन्या पुत्रही सोडून २

५

काळ जातो क्षण क्षण मूळ येईल मरणा १
कांहीं धांवाधांव करीं जंव तो काळ आहे दुरी २
देह आहे जाइल नेणें भुललासी कवण्या-गुणें ३
माया-जाळीं गुंतलें मन परि हें दुःखाचें कारण ४
सत्य वाटतें सकळ परी जातां नाहीं वेळ ५
रामीं रामदास म्हणे आतां सावधान होणें ६

६

झालें देह हो गलीत आले संसार लंघित १
सावधान सावधान पुढें नाहीं व्यवधान २
आतां मन आटोपावें आपुल्या निजधामा जावें ३
राहे देवाचें स्मरण रामीं रामदास म्हण ४

७

पुण्य-पहावया कारणें देव धाडी बोलावणें[1] १
वाट चांगली धरावी पुण्यसामोग्री करावी २
वाटे वेचना ही[2] जाया पुढें सूख कैचें तया ३
रामीं रामदास म्हणे बुद्धिवंत ते शहाणे ४

८

---

१ स्तुतिपाठकरून . २ मोक्षवाट .





# रामदास.

अंतकाळ येतयेतां पुढें नये चुकवितां १
अकस्मात लागे जावें कांहीं पुण्य आचरावें २
पुण्यावीण जातां प्राणी घडे यमाची जाचणी ३
रामदास म्हणे जना कठिण यमाची यातना ४

९

अभक्त भोगीत यातना देव राखे भक्त-जना १
देव भक्त दोन्ही एक यम देवाचा सेवक २
भक्तें-देव केला सखा तोचि त्यांचा पाठी-राखा ३
रामीं रामदास म्हणे भक्तिकराया-कारणें ४

१०

लक्ष्मी आहे रे चंचल इस जातां नाहीं वेळ १
सत्य मानावें उत्तर देव नित्य निरंतर २
नानावैभव समस्त येति जाति अकस्मात ३
म्हणे रामीं रामदास काय देहाचा विश्वास ४

११

नानाव्यथा उद्भवती प्राणि अकस्मात जाती १
मृत्यु बांधला पदरीं होति आयुष्याची भरी २
काळ लागला सन्निधी एक घडी लागों नेदी ३
रामदास म्हणे खुणें भेद जाणती शाहाणे ४

१२

नदी-मर्यादा सांडिती उष्ण-काळीं वोस होती १

तैसा तारुण्याचा भर　सवेंचि होतसे उतार　२
भाग्य चढें लोंगीं वेगें　सवेंचि प्राणी भीक मागे　३
रामदास म्हणे काळ　दानीं दिवस पर्व-काळ　४

१३

पुरें पट्टण वसती　एक वेळे वोस होती　१
तैसें वैभव सकळ　येतां जातां नाहीं वेळ　२
बहु-सृष्टीची रचना　होय-जाय क्षणक्षणा　३
दास म्हणे सांगों किती　आले गेले चक्रवर्ती　४

१४

सेवकासी भाग्य चढे　त्याचें आधिन होणें पडे　१
देव करिल तैसें व्हावें　काय करिल तें पहावें　२
वर्तमान पडे जैसें　उगेंच व्हावेंलागे तैसें　३
दास म्हणे वेळ कैसी　राज्य जाहलें कलिसीं　४

१५

काम क्रोध खवळले　मद मत्सर मातले　१
त्याचे आधीन लागे होणें　ऐसें केलें नारायणें　२
लोभ दंभ अनावर　जहाला गर्व अहंकार　३
दास म्हणे सांगों किती　पडली ऐवांची संगती　४

१६

ऐसें कैसें रे सोवळें[1]　शिवतां होतसे ओवळें　१
स्नान-संध्या टिळे माळा　पोटीं क्रोधाचा उमाळा　२

---

१ सैरावैरा-

बाह्य केली झळफळ देह-बुद्धिचा विटाळ ४
नित्य नेम खटाटोप मनीं विषयाचा जप ५
रामदासीं दृढ-भाव तेणें-विण सर्व वाव ६

१७

देह विटाळाचा गोळा कैसा होतसे सोंवळा १
तुज कळेना विचारु ऐसें यासि काय करुं २
दृढ केला अभिमान तेणें साधणें बंधन ३
रामदासीं स्वामीविण केला तितुका होय शीण ४

१८

गेला संदेहाचा मळ तेणें निःसंग निर्मळ १
बाह्य-गंगाजळ-स्नान चित्तशुद्धि ब्रम्हज्ञान २
सर्वकाळ कर्मनिष्ठ सर्व-साक्षित्वें वरिष्ठ ३
रामदासीं स्नानसंध्या सुत करी माता वंध्या ४

१९

सर्व-काळ संतृप्तता तृप्त केली लोलंगता १
फळ जहालें तर्पणीं संसारासीं पडिलें पाणी २
देवराव तृप्त केले भावें आत्म निवेदिलें ३
रामदासाचे तर्पणीं सर्व केलें रामार्पणीं ४

२०

अनित्याचा भ्रम गेला शुद्ध नित्य नेम केला १

१ बाहेर.

नित्या-नित्य हा विचार केला स्वधर्म आचार २
देह-बुद्धी अनर्गळ - बोधें फिटला विटाळ ३
रामदासीं ज्ञान झालें आणि स्वधर्म रक्षिलें ४

२१

## वेडसर

### पंचक.

पडसोदासीं[2] करी वाद स्वछाळाशीं[1] तो विवाद १
तेथें चालेना मीपण झीया पावावा आपण २
सावधाना-सवें जावें प्रतिबिंबेसीं भांडावें ३
रामदास म्हणे भावें समुद्रासीं गडगडावें ४

१

संत बोलले बहुविध तेथें कैचें म्हणु सिद्ध १
कोण कोणासीं भांडावें कोण्या पंथासीं मांडावें २
बहु वाचा पृथ्वीवरी बहु शब्द नानापरी ३
नाना सैन्य नाना पुरें दास म्हणे ते उत्तरें ४

२

माया अविद्येचें बंड नाना-प्रकारीं थोतांड १
अवघें सोडुनीयां द्यावें एक भगवंता पहावें २
पंचभूतांचा मेळावा द्रव्य पदार्थ[3] आघवा ३

१ स्वैरच्छ. २ प्रतिध्वनि. ३ सर्व.

३

आमचे वंशीं कैंचा राम  एक पीढिचें निःकाम  १
राम-दास्य आलें हातां  अवघा वंश धन्य आतां  २
बापें केली उपासना  आम्ही लाधलों त्या धना  ३
बंधु अभिलाष टेंकला  वाटा घेउनि भिन्न झाला ४
पोर सकळां संकोचले  एक स्रुखा उधळले  ५
रामीं रामदासीं-स्थिति  पाहिली वडिलांचि रीती ६

४

माजीं बांधावा भोंपळा  तैशी बांधोनये शिळा  १
सारासार निवडावें  तैसें जाणोनीयां घ्यावें  २
रत्न खडे येर खडे  सगट देतां प्राणीं रडे  ३
एका ठायीं सोनें लाख  लाख देतां मारी हांक  ४
मनुष्य गोड घांस घेतें  कडु आवघें सांडितें  ५
दास म्हणे भक्ति-सारा  नको अभक्ता गव्हारा  ६

५

गगन आडतचि नाहीं  तैसें निरंजन पाहीं  १
चंचळ-गुणें सगुणें  विकार आड तो पावणें  २
सारासार निवण[2] नाहीं  प्रत्ययानें पाहे कांहीं  ३
कडु-विख आणि वावडें  तया सळडोनि पडे वेडें  ४
तैसें संसाराचें सुख  आदि-अंतीं अवघें दुख  ५

---

१ आकाररहित  २ डोळे स्वच्छ होण्याकरितां घडी घालतात ती

भगवंताचे भक्ति-साठीं थोर करावी आटाआटी १
स्वेद[3]-बिंदु आले जाण तेंचि भागिरथीचें स्नान २
चोळंगता देव-राव सहज होतसे उपाव ३
सकळ लोकांचें भाषण देवासाठीं संभाषण ४
जें हारवलें सांडलें देवावीण कोठें गेलें ५
जठराग्नीस अवदान लोक म्हणती भोजन ६
एकवीस सहस्र जप[4] होतो न करितां साक्षेप ७
दास म्हणे मोठें चोज देवीं सहजीं सहज ८

७

माजीं बांधावा भोंपळा तैसी बांधोनये शीळा १
घेउनये तेंचि घ्यावें येर अवघेंचि सांडावें २
विषवल्ली अमरवल्ली अवघें देवेंचि निर्मिली ३
अवघी सृष्टीची लगट करूनये किं झगट ४
अवघेंची केलें देवें जें जें माने तेंचि घ्यावें ५
अवघें सगट सारीखेंची वाट मोडे साधनाची ६
दास म्हणे हरिजन धन्य जाणे तो सज्जन ७

८

वेधें भेदावें अंतर भक्ति घडे तदनंतर १

---

१ घेरा - २ पात्रासारखा - ३ घर्म - ४ श्वासोच्छ्वास संख्या

मना-सारिखें चालावें हेतु जाणोनी बोलावें २
जनीं आवडीचे जन तेचि होती हो सज्जन ३
बरें परिक्षावें जना अवघे सगळ पिटवना ४
दास म्हणे निवडावें लोके जाणोनीयां घ्यावे ५

९

यथातथ्य आठवेना कांहीं हीत तें घडेना १
कांता ज्याचे बंदिखाना नव महिने पतना २
बारावर्षे बाळपण आंगीं होतें मूर्खपण ३
पुढें तारुण्याचें भरें आलें कामाचें वीरवारें ४
पुढें आलें वृद्धपण सवें पातलें मरण ५
दास म्हणे रात्रंदिवस नाहीं मराया अवकाश ६

१०

देवें जन्मासि घातलें नाना सुख दाखविलें १
त्यासि कैसें विसरावें पुढें केसेंनि तरावें २
कुळ समुळ सांभाळिलें नानाप्रकारीं पाळिलें ३
दास म्हणे देवावीण दुजा सांभाळी तो कोण ४

११

रात्रंदिवस दुश्चित चारि घटिका सावचित्त १
होउन कीर्तिनें बैसावें भावें भगवंतासि गावें २
सदा संसार कथन क्षण एक सावधान ३
दास म्हणे वारंवार बहुसाल खबरदार ४

१२

रात्रंदिवस गव्हार फिरतसे दारोदार १
आपलें मन आटोपावें नाहीं तरी फजित व्हावें २
कल्पनेचे भरेवरी करूं नये तेंचि करी ३
दास म्हणे हें वोढाळ आटोपिना तो चांडाळ ४

१३

काय करीतें हें मन साक्ष आपुला आपण १
हित आपुलें करावें नाहीं वीर्यल्लोका जावें २
काय वासना म्हणते आपणास साक्ष येते ३
मन असे वरगळ केल्या होतसे विव्हळ ४
सोडिना हें संसारिक काहीं पाहावें विवेक ५
दास म्हणे सावधान पदरीं बांधलें मरण ६

१४

---

# क्षोभ
# पंचक.

करितां सांभाळ आपुला दुःखें जीव भांबावला १
पाहोंजातां सारासार कांहीं कळेना विचार २
लोभें वृत्ती लांचावली क्षोभें वृत्ती जाजावली ३
रामीं रामदास म्हणे कोण[1] उपाय करणें ४

---

१ सोकावली.

संग स्वार्थाचा धरिला तेणें काम बळावला १
थोरपणें हे मातले तेणें आव्हाटीं घातले २
कामामागें आला क्रोध क्रोधें केला बहू खेद ३
लोभ दंभाचें कारण मोहें केलें विस्मरण ४
कामिं लाचावलें मन झालें बुद्धिचें पतन ५
दास म्हणे हो सकळ अवघें अविद्येचें मूळ ६

२

गेला प्रपंच हातींचा लेश नाहीं परमार्थाचा १
दोहींकडे अंतरलों थोरपणें भांबावलों २
गेली अवघी निस्पृहता नाहीं स्वार्थही पूरता ३
पूर्ण झाली नाहीं आस इकडे बुडाला अभ्यास ४
दास म्हणे क्रोधें केलें अवघें लाजिरवाणें झालें ५

३

उगमीं विषें कालवलें तेंचि प्रवाहीं पडलें १
आतां कोणेकडे जावें कोणत्या प्रकारें असावें २
होता भूषणाचा ठावो तेथें जहाला अभावो ३
मूळ अंतरीं तें वेडें जहालें अवघेंचि वांकडें ४
छाया शांतिची नावडे क्रोध-वणवा आवडे ५
रामदास म्हणे जत्न झाला अंतरीं विकल्प ६

४

सन्निपाताचें लक्षण अवघें झालें कुलक्षण १

आणी क्रोध पिसाळले त्यास कोण म्हणे भले ४
मना आलें तें करावें बळेंचि अन्हाटि वरावें ५
रामदास म्हणे खरें ज्याचें त्यासी वाटे बरें ६

५

अधिक बोलोंचि नेदिती धरुनि जीभचि कापिती १
तेथें चालेनाकीं ताठा पोटासाठीं देशवटा २
हात पाय ते कापिति कर्ण नासिक छेदिति ३
नानाप्रकारीं यातना अवघें श्रुत आहे जना ४
दास म्हणे सेवाचोर साहेबाचे हरामखोर ५



## वोसण
## पंचक.

वोसणरे वोसणरे वोसणरे राग वोसणरे १
आढळेना आढळेना आढळेना संत आढळेना २
उमजेना उमजेना उमजेना पंथ उमजेना ३
कोण जाणे कोण जाणे कोण जाणे रामदास जाणे ४

१

चालवेना चालवेना चालवेना पंथ चालवेना १



जड जातो जड जातो  जड जातो सत्य जड जातो ४
धरवेना धरवेना  रामदास म्हणे पण करवेना ५

२

संतापलें संतापलें  संतापलें मन संतापलें १
झीजला गे झिजला गे  झीजला गे देह झिजला गे २
सोसवेना सोसवेना  सोसवेना वीण सोसवेना ३
धीर नाहीं धीर नाहीं  दास म्हणे अंतर पाहीं ४

३

त्यागवेना त्यागवेना  त्यागवेना भाग्य त्यागवेना १
बुद्धि नाहीं बुद्धि नाहीं  बुद्धि नाहीं देहबुद्धी नाहीं २
धरवेना सोडवेना  तोडवेना मन वोढवेना ३
दास म्हणे दास म्हणे  पोटिंचा निश्चय कोण जाणे ४

४

मोकल रे मोकल रे  मोकल रे मना मोकल रे १
योग नाहीं योग नाहीं  त्याग नाहीं वित्तेराग[2] नाहीं २
भक्ति नाहीं मुक्ति नाहीं  देव नाहीं सानुकूल नाहीं ३
जप नाहीं तप नाहीं  गुण नाहीं निर्गुण नाहीं ४
ज्ञान नाहीं ध्यान नाहीं  लय नाहीं साधन नाहीं ५

---

१ पाठीश. २ धनलोभ.

दान नाहीं पुण्य नाहीं   कर्म नाहीं स्वधर्म नाहीं ८
तीर्थ नाहीं व्रत नाहीं   शांति नाहीं विश्रांती नाहीं ९
न्याय नाहीं नीति नाहीं   दास म्हणे कांहिंच नाहीं १०

५

साधिल रे साधिल रे   साधिल रे भव साधिल रे १
काम आहे क्रोध आहे   मद आहे मत्सर आहे २
लोभ आहे दंभ आहे   क्षोभ आहे क्षेम आहे ३
भेद आहे खेद आहे   वाद आहे उच्छेद आहे ४
पाप आहे दोष आहे   अंतरीं पहातां द्वेष आहे ५
अर्थ आहे स्वार्थ आहे   मान्य तें करणें अनर्थ आहे ६
जाणवेना जाणवेना   दास म्हणे खुण सांगवेना ७



## विवेक पंचक.

एक देव आहे खरा   माया नाथिलें पसारा १
हेंचि विचारें जाणावें   ज्ञान तयासि म्हणावें २

---

१ वेष्टिलें.

रामदासाचें बोलणें स्वप्नामाजी जाई जेणें ६

१

पूर्वी म्हातां मी कोण धुंडुं आपणा आपण १
स्वयें आपुला उगंव[1] जाणे तोचि महानुभव[2] २
कोण कर्म आचरला कैसा संसारासी आला ३
आले वाटे जो मुरडे[3] देव तयासी सांपडे ४
आली वाट ती कवण मायेचें जें अधिष्ठान ५
रामदासाची उपमा याम नाहीं कैंची सीमा ६

२

पांचा लक्षणीं पुरता धन्य धन्य तोचि ज्ञाता १
विवेक वैराग्य सोडीना कर्म-मर्यादा सांडिना २
बाह्य बोले शब्द-ज्ञान अंतर्यामीं समाधान ३
रामीं रामदास कवी न्याय नीतीनें शीकवी ४

३

अंतर्यामीं समाधान बाह्य सगुण भजन १
धन्य धन्य तेंचि ज्ञान अंतर्यामीं समाधान २
निरूपणें अंतस्त्याग बाह्य संपादी वैराग्य ३

---

१ मूळ. २ मोठा अनुभविक. ३ पाठी मांगें फिरे.

कौल[1] झाला रघुनाथाचा मेळा मिळाला भक्तांचा १
अहं-भाव बरचेबरी बळेंचि घातला बाहेरी २
क्षेत्रीं विवेक जहाला क्रोध देशो-धडी[2] केला ३
काम देहींचा कोंडिला मद मत्सर पाडिला ४
लोभ दंभ नागविला अहंकार बुडविला ५
कुडें मीपण पळालें उगेंच अज्ञान गळालें ६
फितवे[3]खोर होता द्वंद्व त्याचा केला शिरच्छेद ७
तिरस्कार दावे-दार त्यास बोधें केला मार ८
मन चोरटें धरिलें नित्य नेमें जर्जर केलें ९
आळस साक्षेपें घेतलें पायीं धरुनि आपटिलें १०
दुश्चितपणा अकस्मात निरूपणीं केला घात ११
कपट-भेद सांपडले उभें सर्वांगीं तोडिलें १२
वेड पाखांड तूटिलें बळेंचि धरूनि कुटिलें १३
शब्द बांधोनी पाडिला निःशब्द तेथें प्रतिष्ठीला[4] १४
गर्व ताठा विटंबिला वाद विवेकें झाडिला १५
जेणें भावार्थ उडविला धरुनि विकल्प बुडविला १६
करुनि अभावाचा नाश राहे रामीं रामदास १७

---

१ आज्ञा. २ देशत्याग करण्याजोगी विपत्तीस. ३ फितुर करणारा
४ स्थापिला.

## वैराग्य

### पंचक.

प्रपंच सांडुनीयां बुद्धी जडली परमार्थ उपाधी
मना होई सावचित त्याग करणे हा उचित २
संप्रदाय समुदाव तेणें जडे अहंभाव ३
रामदास म्हणे नेम भिक्षा मागणें उत्तम ४

१

प्रपंच केला ताडातोडी जडली परमार्थाची बेडी १
सावधान होई जीवा त्याग केलाचि करावा २
काम क्रोध राग द्वेष अंगीं जडले विशेष ३
रामदासें दूरें केलें अवघें आणोनी त्यागिलें ४

२

कोण कैंचा रे भीकारी भिक मागे दारोदारीं १
ऐसें म्हणे तेथें जावें स्फ रवें वैराग्यें फिरावें २
आहे ब्राम्हण विदेशी नाहीं ठाऊक आम्हासी ३
रामीं रामदास म्हणे कोण आहे कोया जाणे ४

३

नको वोळखीचें जन अंगीं वाजे अभिमान १
आतां तेथें जावें मना जेथें कोणी वोळखीना २
लोक म्हणति कोण काये पुसों जातां सांगों नये ३
रामदास म्हणे पाहीं तेथें कांहीं चिंता नाहीं ४

४

देह जावो अथवा राहो रामें फेडिला संदेहो १
रामालागीं देशधडा संसाराच्या बारा वाटा २
जीवालागीं आदि अंतीं एक रामाची संगती ३
रामदासीं रामरावो नाहीं आणीक उपावो ४

५

सांज वोसरतां साल वायां करावा आकांत १
तैसीं सखीजीवलगें जाति एकामेकां-मागें २
चार दिवस यात्राभरे सवेंचि मागुती वोसरे ३
पूर्ण होतां महोत्सावो फुटे अवघा समुदावो ४
बहुत वराडी मिळाले जैसे आले तैसे गेले ५
एक येती एक जाती नाना कौतुक पाहाती ६
बंधु बहिणी माता पिता कन्या पुत्र आणी कांता ७
ऋणानुबंधाचें कारण वायां शोक निःकारण ८
एक बहुसाल जिती एकवेळ वारीं जाती ९
बहु साले दास दासी नानापशु गाई महिषी १०
धन धान्याचें संचित कांहीं होत कांहीं जात ११
रामीं रामदास म्हणे संसारासीं येणे जाणें १२

६

कोणी पुत्र कामा नये मित्र करी तो उपाये १
कैचें आपुलें परावें अवघें ऋणानुबंधें घ्यावें २
जीवलगाची-येपरी मातेहुनी लोभ करी ३

आहे कोण जाणे कैंची पारि ते जिवाचे जीविंची ४
जीवलग जीव घेती त्यासिं पराबीं रक्षिती ५
रामी रामदास म्हणे न कळे देवाचें करणें ६

७

जे जे संसारासी आले ते ते तितुकेहि एकले १
वायां आपुलीं मानिलीं शेखीं दुरी दूरावलीं २
सखी सांडुनियां देशी मृत्यु पावली विदेशीं ३
खाती व्याघ्र आणि लांडगे तेथें कैंचीं जीवलगें ४
घरीं वाट पाहे रामी आपण गेला समरंगणीं ५
रामीं रामदास म्हणे अवघीं जाणावीं पिशुनें ६

८

देह बहूतांचें खाजें मूर्ख म्हणे माझें माझें १
विंचु विखारें अजगर नाना श्वापदें अपार २
नाना पक्षी गीध काक श्वान मार्जार जंबुक ३
लाव लासी भूत खेत सांगोंजातां असंख्यात ४
किती सांगों वारंवार जीवजीवाचा आहार ५
म्हणे रामीं रामदास कैंचा देहाचा विश्वास ६

९

घात करूनी आपुला काय रडसी पुढिला १
बहु मोलाचें आयुष्य विषयलोभें केला नाश २
नाहीं वोळखिलें सत्या तेणें होते आत्महत्या ३

नर-देहाची संगती गेली गेली हानी हानी ४
नाहीं देहाचा भरवसा गेला गेलारे वायसा ५
रामी रामदास म्हणे भुलूं नको मूर्खपणें ६

१०

कोणें कोणासीं रडावें एका मागें एकें जावें १
एकवेळ गेली माता एकवेळ गेला पिता २
द्रव्य दारा जाती पुत्र जीवलगे आणि मित्र ३
प्राणी संसारासी आला तितुका मृत्युपंथें गेला ४
पूर्वज गेले देवापासीं तेचि वाट आपणासीं ५
रामदास म्हणे लोक करी गेलियांचा शोक ६

११

ज्याचें होतें तेणें नेलें तेथें तुझें काय गेलें १
वेगीं होई सावधान करीं देवाचें भजन २
गती नकळे होणाराची हे तंव इच्छा भगवंताची ३
पूर्व-संचिताची फळें येती दुःखाचे होलाळे ४
पुर्वी केलें जें संचित तेणें भोगवि निश्चित ५
दास म्हणे पूर्व रेखा प्राप्त नटळे ब्रम्हादिकां ६

१२

वाढे संसार दुस्तर होती दुःखाचे डोंगर १
तरी श्रवण करावें तेणें दुःख विसरावें २
पुढें काय करूं आतां वाढे संसाराची चिंता ३

येतां उभंड भरेना मायाजाळ आवरेना ४
दुरी जाउनी विवेक आणि आदळतो शोक ५
रामीं रामदास म्हणे दुःख जीवें धरीं उणें ६

१३

काम क्रोध मद मत्सर जरि बोले अनाचार १
त्यासि करावें साधन सदा श्रवण मनन २
बोला ऐसें चालवेना जीव भ्रांती हालवेना ३
दृढ लौकीक सांडेना ज्ञान विवेक माडेना ४
पोटीं विकल्प फुटेना नष्ट संदेह तूटेना ५
दास म्हणे निर्बुजलें मन संसारीं बुडालें ६

१४

केला करी विश्वेश्वर श्वेतबंध रामेश्वर १
तरी संशय तुटेना पूर्वगूण पालटेना २
भागीरथी गोदावरी केली कृष्णा आणि कावेरी ३
राम अयोध्येचा पती कृष्णें केली द्वारावती ४
बद्रि ओढ्या जगन्नाथ केला स्वामी भिमल्लनाथ ५
मातापूर तुळजापुर सप्तशृंगी कोल्हापुर ६
केली पंढरी नरहरी शंभु पाहिला शीखरीं ७
मोरेश्वर भुलेश्वर ज्वालामुखी हरेश्वर ८
सिद्ध भैराळ मारुती देवें केले नेणों किती ९
बारा लिंगें या वेगळीं तीर्थें केलीं भूमंडळीं १०

रामदास म्हणे भावें तरि हें मन पालटावें ११

१५

एक उपासना-धारी भक्ति भावें त्याची करी १
सर्व नेश्वर जाणुन वृत्ति करीं उदासीन २
सत्य वस्तू तें साचार त्याचा करावा विचार ३
त्यागुनियां अनर्गळ सदां असावें निर्मळ ४
ध्यानें आवरावें मन आणि इंद्रिय-दमन ५
अखंड वाचे रामनाम ध्यान संध्या नित्य-नेम ६
दास म्हणे सर्व भाव जेथें भाव तेथें देव

१६

मुख्य पूजा परंपार एकाहूनि एक थोर १
आतां कोठें ठेऊं भाव जेथें तेथें महादेव २
माझे कुळींचें दैवत पाहों जातां असंख्यात ३
राम कृष्ण महादेव बनशंकरि खंडेराव ४
माता सटवाई आपण स्वामी लक्ष्मीनारायण ५
वीर बैसविला देव्हारा माझी माता एकवीरा ६
माय राणी पांडुरंग मुंजा नरसिंग झोटिंग ७
माहालक्ष्मी रवलिया कुळदैवत मोरया ८
अणुदेवी होय माई सप्तशृंगी चंडाबाई ९
तुळजापुरीं तुकाबाई घाटमाथाची नवलाई १०
दंडपाणी जोगेश्वरी माता कामाक्षी कावेरी ११

म्हैसाबाई नारायण आच्या वेताळ कारण १२
मुंजा जोगिणी मागिणी बहुसाळ मानविणी १३
धोपेश्वर कोपेश्वर सिद्धेश्वर सोमेश्वर १४
सात पांच रंगनाथ त्र्यंकटेश वैजनाथ १५
अन्नपूर्णा शालिग्राम हयग्रीव मेघश्याम १६
परशराम कोटेश्वर नाना शक्ती परमेश्वर १७
मल्हिकालती भोगावती आमुच्या देव्हारांची सती १८
रानदेवी नारायणा म्हैसासुर मल्लिकार्जुन १९
अग्निसारिखें दैवत आणि मुख्य मागनाथ २०
देव तांबडे अनेक बहुसाळ केला ठाक २१
तांबें देवते नर्मदे देव टाकले तुसदे २२
सोमकांत सूर्यकांत नाग नाणि चक्रांकित २३
औटहात मृत्तिकापूजन नाना देवाचें लेखन २४
डाउ पूजावे अनंत गौरी आणि तेशोईत २५
रामदासीं देव एक येर सर्वही नाईक २६

१७

भाव धरीं संतापायीं तेणें देव पडे ठायीं १
नाना देवाचें भजन तेणें नाहे समाधान २
सकळ देवांमध्यें सार आहे अनंत अपार ३
रामीं रामदास म्हणे अवघे देव केले जेणें ४

आतां कोणा शरण जावें  सत्य कोणाचें मानावें १
नाना पंथ नाना मतें  भूमंडळीं असंख्यातें २
जरी तपी नाना हटी  मंत्रावळी लक्ष कोटी ३
एक मुद्रा हे लाविती  एक आसन घालिती ४
एक दाविती देखणी  एक अनेस्यूत-ध्वनी[1] ५
एक नासाग्रीं लक्षिती  एक हृदयीं दावीती ६
पिंडज्ञानी तत्वज्ञानी  योगाभ्यासी सिद्ध ज्ञानी ७
पंचाक्षरी धूम्रपानी  शीरांजन उपोषणी ८
दुग्धाहारी निराहारी  फळा-हारी पर्णा-हारी ९
एक औषधी-प्रयोग  एक देवी धातुमार्ग १०
एक विभूती लाविती  एक मीध-[2]हरी वती ११
दंडधारी जटाधारी  एक बाळ-ब्रम्हचारी १२
मौनी नग्न-दिगांबर  पंचाक्षरी योगेश्वर १३
एक जोसी आणि वैदिक  एक पंडित पुराणिक १४
साधु संत मुनीश्वर  ऋषेश्वर कवीश्वर १५
गाती हरिदास वागडे  नृत्य करिती देवापुढें १६
एक म्हणती अवघें वाव  एक म्हणती अवघे देव १७
एक कळोंचि नेदिती  एक दाटुनी सांगती १८
एक कर्मीच तत्पर  एक कर्मी अनादर १९
एक मानिती सगुण  एक मानीती पाषाण २०

१ एकसारिखी ध्वनीकरणारे. २ गोपीचंदन.

एकें केला सर्व त्याग एक म्हणती राजयोग २१
रामदास सांगे खुण भक्तिवीणें सर्व-क्षीण २२

१९

शरण जावें संत-जना सत्य मानावें निर्गुणा १
नानामतीं कायचाड कारण सत्याचा निवाड २
ज्ञानें भक्तीसीं जाणावें भक्त तयासीं म्हणावें ३
रामीं रामदास सांगे सर्वकाळ संत-संगें ४

२०

संत कैसेनी जाणावे साधु कैसे वोळखावे १
बहुत गोसावी असती भले अवघेचि दीसती २
एक संसारीं गुंतले एकें वेष पालटिले ३
रामीं रामदास म्हणे कैसीं संतांचीं लक्षणें ४

२१

तेचि जाणावे सज्जन जया शब्द ब्रम्हज्ञान १
जबवरि देहाची संगती तववरी सगुणी भजनी २
जाणोनियां सारासार सदा श्रवणीं तत्पर ३
बाह्यत्याग संपादणें अंतर-त्याग निरूपणें ४
कर्म करीती आवडी फळाशांची[1] नाहीं गोडी ५
शांती क्षमा आणि दया सर्वसख्य मानी जया ६
हरिकथा निरूपण सदा श्रवण मनन ७

---

१ फलप्राप्त होण्याविषयींची आशा-आशांची.

बोला सारिखें चालणें हींच संतांचीं लक्षणें ८
एकनिष्ठ उपासना अती तत्पर भजना ९
स्वार्थ सांडुनीयां देणें नित्य तेंचि संपादणें १०
म्हणे रामी रामदास जया नाहीं आशापाश ११

२२



## नीति पंचक.

काम-क्रोधें खवळला तेणें सन्निपात झाला १
त्यास औषध करावें पोटीं वैराग्य धरावें २
कुपथ्य अवज्ञेचें झालें मग तें पुढें उफाळलें[1] ३
मर्यादेनें निर्बुजलें वारें अभिमानें घेतलें ४
दडपणाचा घाम आला प्राणि उठोनि पळाला ५
रामदास म्हणे भले लोक म्हणति पिसाळले ६

१

झालें होऊनीयां गेलें आतां कैसें होय भलें १
यासि सांगतों साधन जेणें होय समाधान २
दिवसें दिवस व्यथा सरे अंगीं आरोग्यता भरे ३
अनुताप दुरी गेले कांहिं किंचित उरले ४
व्यथा हरली विशेष अस्समान उरला दोष ५

---
१ फुगलें.

दास म्हणे जन्मवरी पुढें विकार नानापरी ६

२

मर्यादेचे वाटे जावें अनीति ओल्हांठ त्यजावें १
एक राम आहे खरा तिकडे गुरु परंपरा २
एकाकडे आहे जन एकाकडे ते सज्जन ३
पुढें विवेकें वर्तावें मागें मूळ सांभाळावें ४
उदंड झाले समुदाये तरी आदि सोडूं नये ५
रामीं रामदास म्हणे जगीं मान्य तें बोलणें ६

३

अभक्तांसी निंदी जन गुरुद्रोहीया सज्जन १
याकारणें वाटे जावें लागे अवघेंचि करावें २
सगुण-भजतां ज्ञान मोडे ज्ञानें सगूण आवडे ३
कर्में होतसे उपाये कर्मठपण कामा नये ४
शब्दें होय समाधान कामा नये शब्द-ज्ञान ५
रामीं रामदास म्हणे कीती सांगों मी लक्षणें ६

४

धरितां देवासीं अभाव तोंड धरि पाडी देव १
याकारणें वाटे जावें लागे अवघेंचि रक्षावें २
आहे देवासी उपाये गुरु-क्षोभ कामा नये ३
होतां क्रिया अमंगळ त्यासि निंदिती सकळ ४
एक वैराग्य त्यागितां अंगीं वाढे लोलंगता ५

१ पसारे.

रामीं रामदास म्हणे सर्व नीतिनें करणें ६

५



## उपासना

## पंचक.

ज्ञातेपण आधीं सांडी जाणत्या नावडे पाषांडी[1] १
देव पतित-पावन त्यासिं करी अभिमान २
ध्रुव प्रऱ्हाद आपुले भक्त जेणें उद्धरिले ३
बहु साल भूमंडळीं तारी भक्तांची मंडळी ४
जड मूढ सांगों किती ज्याचिं नामें असंख्याती ५
रामीं रामदास म्हणे अंतकाळीं सोडवणें ६

१

पूजा देवाची प्रतीमा त्याचि नकळे महिमा १
देव भक्तांचा विश्राम त्यासि नेणें तो अधम २
नाना स्थानें भूमंडळीं कोणि सांगावीं आगळीं ३
ज्याचे चरणींचे उदकें धन्य होती विश्व-लोकें ४
ज्याचीं चरित्रें ऐकतां जनीं होय सार्थकता ५
रामीं रामदास म्हणे धन्य होईजे स्मरणें ६

२

देव भक्तांचा कैवारी रक्षितसे नानापरी १

---

[1] पाखांडी.

काय स्तंभीं प्रगटला तेणें प्रल्हाद रक्षिला २
तये द्रौपदी-कारणें वस्त्रें दील्हीं नारायणें ३
महा-संकटीं रक्षीलें गजेंद्राशीं सोडवीलें ४
कूर्मरूपें धरिली धरा झाला वराह सुंदरा ५
जाणे दासाचें अंतर लाखा जोहरीं वीवर ६

३

भक्तालागीं पावे वेगें वारि भक्तांचीं संकटें १
देव भावें लांचावला त्यासि अभिमान लागला २
आपुल्या भक्तांचें जें उणें साहेना तें कोटी-गुणें ३
दास म्हणे नानापरी देव भक्तांचा कैवारी ४

४



## भक्ति
## पंचक.

सोडिं संसाराची आस धरीं भक्तीचा हव्यास १
दुःखमूळ हा संसार तयामध्यें भक्ति-सार २
ग्रंथ पहातां लक्ष कोटी जेथें तेथें भक्ति मोटी ३
जन्मा आलीयाचें फळ दास म्हणे तें सकळ ४

१

राम दासाचा कैवारी सेवकांचा अंगीकारी १
अंगिकारिले वानर त्यांचि ख्याती झाली थोर २

स्वयें नीजा धामा जाणें राज्य कीजे बिभीषणें ३
भक्तां उणें देखे जेथें स्वयें धांव घाली तेथें ४
मज वैर केलें साहे परि भक्तांचे न साहे ५
रामीं रामदास म्हणे निज-भक्तांचे निरुणें ६

२

भक्ती रामाची करावी वंशावळी उद्धरावी १
तन मन आणि धन सर्व लौकीक सोडुन २
पांचा पंचकाचें भरें सर्वकाळ अत्यादरें ३
रामीं रामदास म्हणे दृढ-भक्तीचे निरुणें ४

३

नर-मनुष्यें काय द्यावें एक रघुवीरा मागावें १
उपमन्यें धांवा केला क्षीरसिंधु त्या दीधला २
धुरु शरण चक्रपाणी आढळ शोभा तारांगणीं ३
राम म्हणतां वदनीं गणिका बैसली विमानीं ४
बाळ-मिञजन कांचन त्याचें दरिद्र विच्छिन्न ५
कुब्जा रंगली म्हातारी केली लावण्य सुंदरी ६
शुक मिषें रामवाणी म्हणतां पावन कुंटिणी ७
शरणागत नीशाचर राज्य देऊनी अमर ८
होता बंधुनें गांजिला तो सुग्रीव राजा केला ९
तया अंबरुषी-कारणें दाहा जन्म येणें जाणें १०

---

१ गणिका. २ बिभीषण.

रामदासीं रामराव निजपदीं दिधला ठाव ११

४

शिरीं आहे रामराज औषधांचें कोण काज १
जोजो प्रयत्न रामावीण तो तो दुःखासी कारण २
शंकराचें हळाहळ जेणें केलें सशीतळ ३
आम्हां तोचि तो रक्षिता रामदासिं नाहीं चिंता ४

५

विषें शंकरा जाळिलें ज्याच्या नामें सीतळ झालें १
राम-नामाची औषधी जेणें तुटे भव-व्याधी २
शिवें केली काशिपुरी विश्व नामें मुक्त करी ३
राम-नामें तुटे कोड न मनें त्यांसि घाली होड ४
रामदासीं दृढ भाव संदेहासिं केला वाव ५

६

दास आपुले मानावे माझे गुण पालटावे १
काम क्रोध मद मत्सर माझेगर्यी तिरस्कार २
राग द्वेष लोभ दंभ नांदे अंतरीं स्वयंभ ३
रामदास म्हणे आतां देवा तुझे गुण गातां ४

७

धन्य धन्य ते वानर जवळि राम निरंतर १
ब्रम्हादिकां नातुडे[1] ध्यानीं राम वानर-गोठणी[2] २
वेद-श्रुति नेणे महिमा तो गुज सांगे प्लवंगमा ३

१ नमिळे. २ वानरांस.

वानर-वेश धरी देव भाग्यें लाधला केशव ४
दास म्हणे ते देवाचे आवडते रघुनाथाचे ५

८

ताळ वाजे मंद मंद मुखीं हरि-नाम-छंद १
फडके ताळी एकेवेळे घोषें नाचे हें आगळें २
रंगीं हरिदास मातले नाम-घोषें आनंदले ३
उभे हरिदास रंगणीं रामदास लोटांगणी ४

९

राज्य आलें रघुनाथांचें भाग्य उदेलें[1] भक्तांचें १
कल्पतरू चिंतामणि कामधेनूची दुभणी[2] २
परिस जहाले पाषाण अंगीकार करी कोण ३
नाना रत्नांचे डोंगर अमृताचें सरोवर ४
पृथ्वी अवघी स्वर्णमय कोणी-कडे न्यावें काय ५
ब्रम्हादिकांचे कैवारी रामदासाचे अंतरीं ६

१०

एकादशी नव्हे व्रत वैकुंठींचा महापंथ १
परि रुक्मांगदा-ऐसा व्हावा निश्चय मानसा २
एकादशी उपोषणें विष्णुलोकीं वास घेणें ३
रामीं रामदास म्हणे काय प्रत्यक्ष प्रमाणें ४

११

रुक्मांगद होता नर आम्ही काय आहों खर[3] १

---

१ उदयपावलें. २ दूधदेणें. ३ गर्दभ.

देव भक्त वेळाईत राव रंक नाहीं तेथ २
तेणें नेला अवघा गांवु आम्ही स्वयें तरी जावु ३
रामीं रामदासीं काज धरा एकामेका लाज ४

१२

ज्यासी हरिची प्राप्ती व्हावी तेणें हरिदिनि करावी १
एकादशी त्यजिल्या अन्न प्राप्त वैकुंठ भुवन २
रामीं रामदास म्हणें हरिजागर उपोषणें ३

१३

एकादशीच्या अन्नाखालीं भय पातकें लपालीं १
कां जीं संतीं अव्हेरिलीं म्हणुनि तेथें थारावलीं २
म्हणे रामीं रामदास घडे अंगीकारीं त्यास ३

१४

दिनानाथाचा सेवक आम्हा स्वामीहूनि अधिक १
शरणागत राघवाचे परि शरण दारिद्र्याचे २
जें देवास दुःसह तेंचि आम्हा सुखावह ३
रामीं रामदास म्हणें राम-कृपेचेनि गुणें ४

१५

जेथुनीयां प्रबळता केली तेथेंची अहंता १
तरी तें सर्वही जाणार पुढें घातचि होणार २
होताहे भवाचा भार झाली वृत्ती अनावर ३
दास म्हणे एकाकार पडे देवासी कातर ४

१६

सकळ कळा हातीं आल्या रिद्धिसिद्धिही वोळल्या १
तरि आदि सांडु नये देवा भक्तांचा उपाये २
मनो-सिद्धि वाचा-सिद्धी जहाली उदंड उपाधी ३
दास म्हणे राज्य झालें इंद्र-पद हातां आलें ४

१७

आत्मज्ञान पारंगत झाला बोलका मेहंत १
गुरु-पद हातां आलें भूमंडळीं सत्ता चाले २
दास म्हणे ज्ञान झालें सर्व मिथ्यासें कळलें ३

१८

ज्ञान झालें भक्तजना सांडूं नये उपासना १
एका साराचेंहि सार सर्व सागतों विचार २
हेंचि सर्वांचें कल्याण साडुं नये अप्रमाण ३
दास म्हणे अनुभवलें भजन भगवंताचें भलें ४

१९

देव असतां पाठि-राखा त्रैलोक्याचा कोण सखा १
नाना उद्योग वाढती नाना चिंता उद्भवती २
स्वस्थ वाटेना अंतरीं नाना व्यवधान करी ३
रामदास म्हणे भावें भजन देवाचें करावें ४

२०

तोंडपाठ. २ साधु. ३ भक्ती.

## कथा पंचक-

धन्य धन्य तें नगर जेथें कथा निरंतर १
गुण गाती भगवंताचे तेचि मानावे दैवांचे २
स्वयें बोले जगजीवन थोर कलियुगीं कीर्तन ३
रामदास म्हणे भले हरि-भक्ति उद्धरले ४

१

रामनामा-वीणें कांहीं अंतिं सोडवण नाहीं १
गंगातीरीं योगेश्वर अथवा प्रपंचीं इतर २
थोरपणें धरितां ताठा तरितो नागवे करंटा ३
बहुत पूजिलीं दैवतें योग याग नाना मतें ४
धौति पोति हो भुजंगी लोकीं कर्म करिती योगी ५
विनवि रामीं रामदास नाना साधनी सायास ६

२

सकळ साधनाचें फळ राम-नामचि केवळ १
जप तप अनुष्ठान अंतीं नामची प्रमाण २
नाना मंत्र यंत्रावळी सोडवीना अंतकाळीं ३
महा पातकी पतित नामें तारिले अनंत ४
नाम-साराचेंहि सार नाम सकळासि आधार ५
दास म्हणे सांगों किती नामावीण नाहीं गती ६

३

१ नामविशेष-

## निष्ठा पंचक.

ब्रीद आपुलें राखावें आम्हा भक्तां सांभाळावें १
बहु नाहीं बंडाऽचार[1] आतां एकचि निर्धार २
एथें कांहीं नाहीं व्यस्त आतां बोल तो नेमस्त ३
रामदास म्हणे एक आतां धरावा नेमक ४

१

नेणों भक्ति नेणों भाव आम्हीं नेणों दुजा देव १
राघवाचे शरणागत आहों रामनामांऽकित २
सुखीं राम-नामावळी काळ घालूं पायां तळीं ३
रामदासीं रामनाम बाधूं नेणें काळ काम ४

२

राम अनाथाचा नाथ आम्हा कैवारी समर्थ १
वनीं शिळा मुक्त केली गणिका विमानीं वाहिली २
राम दीनाचा दयाळ देव सोडिले सकळ ३
रामीं रामदास म्हणे आतां आम्हां काय उणें ४

३

भूतभविष्याचें ज्ञान जयां अमृत-भोजन १
रे या देवांचा कैवारी तोचि आमुचा सहाकारी २
कल्पतरु चिंतामणी कामधेनुची दुभणी ३
नाना-रत्नाचे डोंगर दिव्य भोग निरंतर ४

---

१ वडिलाचार.

रामदासाची आवडी अवघे देव नेहसी कोडी ५

४



## शिवण

### पंचक.

काम क्रोध आवरावे मद मत्सर वारावे १
सांडोनीयां कुलक्षणें बऱ्हु धरावीं लक्षणें २
लोभदंभासीं लुटावें मीपणासीं आटोपावें ३
विवेक वैराग्य विश्वास धरणे म्हणे रामदास ४

१

हो कां मुमुक्षु अथवा मुक्त आहे विशेष आसक्त १
विवेक वैराग्य-संग्रह करणें लागे यांवद्देह २
रामीं रामदास म्हणे शांति ज्याचें ओढपणें ३

२

मना तूंचि सिकवीसी शेखीं तूंचि नायकसी १
काय सूचसी पाहेरा शरण जावें रघुवीरा २
कांति साचाचीये-परी करिसी शब्दबरोबरी ३
रामीं रामदास म्हणे जळो बहिर्मुखाचें जीणें ४

३

१ मोक्षाचीइच्छाकरणारा. २ यावत्-देह - शरीरआहेतोंपर्यंत. ३ झांक.

खोडी वाउगीच बोली एक रामनामावळी १
प्रेम सोडी देह-बुद्धी मांडी श्रवणीं समाधी २
रामीं रामदास म्हणे अकस्मात लागे जाणें ३

४

ईश्वरासि कानकोंडे अंतिं जाइल कोण्या तोंडें १
लाजे हरीच्या रंगणीं जावयासि लोटांगणीं २
धर्म न करी दुराचारी नागविले राजद्वारीं ३
नादे फुटका कवडा चोरें घातला दरवाडा ४
म्हणे रामीं रामदास प्राणी नागवला सुखास ५

५

पूर्व भूमिका सोडिली जीव झाला दीवा-भूली १
ऐसें भ्रमाचें लक्षण भुले आपणा आपण २
द्रव्य आपण ठेविलें त्याचें तयासि चुकलें ३
रामदास म्हणे घरीं वाट चूकले आंधारीं ४

६

निश्चय
पंचक.

देह चिरकाळ राहो अथवा शीघ्र काळ जावो १
आम्ही वस्ती केली रामीं नाहीं आस्था देह-धर्मीं २

१ टाकीं.

देहा होऊ उत्तम भोग अथवा पडो दुःख-योग ३
रामीं रामदास मीनला देह-दुःखा-वेगळा झाला ४

१

आम्ही मोक्ष लक्ष्मी-वंत भव-दारिद्य्र कैंचें तेथ १
श्रीपतिचे परिजन आम्ही स्वानंद-संपन्न २
समाधान तें सभाग्य असमाधान तें अभाग्य ३
रामीं रामदासीं देव सख्य सहित स्वानुभव ४

२

मोक्ष श्री ते आम्हापाशी द्रव्य-सिद्धी जीच्या दासी[1] १
आम्ही परमार्थ-संपन्न अर्थ काय परिछिन्न २
रामीं रामदास-भाग्य चढतें वाढतें वैराग्य ३

३

समर्थाचे दरिद्री-सुत त्यांचें करणें विपरीत १
परि समर्थ लक्षण सर्व-काळ समाधान २
समर्थाच्या विद्येलागीं मधुकरी मागे जगीं ३
तैसें रामीं रामदासीं ब्रम्हविद्येच्या सायासीं ४

४

सृष्टि दृष्टिसी नाउणावी आत्मप्रचीत जाणावी १
दृश्य-विरहीत देखणें दृश्य तुरे दृश्य-पणें २
सृष्टीवेगळा नीवांत देव भक्तांचा एकांत ३

---

१ आज्ञाधारक, सेवक.

राम अनुभवासि आला दास विवाद खुंटला ४

५

माये-भोंवते भोंवावें तरि तीनें कुरवाळावें १
संत ऐकटा ऐकला एकपणाहि मुकला २
त्यासि माया असोनि नाहीं आप पर नेणे कांहीं ३
रामीं रामदास गाय व्याली नाहीं चाटिल काय ४

६

होला वृक्षाचे डाहाळीं पक्षी गेला अंतराळीं १
तैसी माया वोसंडिली वृत्ति स्वरुपीं राहिली २
खेळकार सूत्र सोडी गेलि आकाशीं वावडी ३
भूमंडळीं होता आला डाग आकाशीं उडाला ४
केले सिद्धिचे साधना पाय वेधला गगना ५
रामीं रामदास म्हणे पाहें दृष्टीं तारांगणें ६

७

हृदय सांडुनीयां मागें वृत्ती गेली लागवेगें १
माया सांडुनि चंचल झाला स्वरूपीं निश्चळ २
कांहीं भासची नाढळे वृत्ति निर्गुणीं निवळें ३
चराचर तें सांडिलें बहुविध वोलंडीलें ४
अवघे एकचि निर्गुण पाहे वृत्तीतें आपण ५
रामदास सांगे खूण वृत्ती चातुर्य लक्षण ६

८

ढला.

# ज्ञान पंचक.

आम्हीं सावधान गावें तुम्हीं सावध ऐकावें १
सकळ सृष्टीचा गोसावी त्याची वोळख पुसावी २
स्वयें बोलिला सर्वज्ञ ज्ञानेंविण अवघे पज्ञ ३
दास म्हणे नाहीं ज्ञान तया नरकीं पतन ४

१

ज्ञानेंवीण जी जी कळा ती ती जाणावी अवकळा १
ऐसें भगवंत बोलिला चित्त द्यावें त्याचा बोला २
एक ज्ञानचि सार्थक सर्व कर्म निरर्थक ३
दास म्हणे ज्ञानेंवीण प्राणी जन्मला पाषाण ४

२

जेणें ज्ञान हें नेणवे पज्ञ तयासि म्हणावें १
जेणें केलें चराचर कोण विश्वासि आधार २
ब्रम्हादिकांचा निर्मिता कोण आहे त्या परता ३
अनंत ब्रम्हांडाच्या माळा विचित्र भगवंताची कळा ४
रामदासाचा विवेक सर्व-घटीं देव एक ५

३

## ध्यान पंचक.

ध्यान लागलें रामाचें दुःख हारलें जन्माचें १
राम-पदांबुजावरी वृत्ति गुंतली मधुकरी २
तनु मेघश्याम-मेळें चित्त-चातक निवालें ३
रामचंद्रनामयेकीं चक्षू-चकोर जहाले सुखी ४
किर्ति-सुगंध-तरुवरी कुंज कोकिळ वैखरी ५
रामीं रामदास स्वामी प्रगटले अंतरयामीं ६

१

मुगुट कीरीट कुंडलें तेज रत्नाचें फांकलें १
ऐसा राम माझे मनीं सदा आठवे चिंतनीं २
कीर्ति-सुखें बाहुवटे दंडीं शोभती गोमटे ३
जडित-रत्नांचीं भूषणें दश्यांगुली विरकंकणें ४
कासे शोभे सोनसळा कटीं सुवर्ण मेखळा ५
चरणीं नेपुरांचे मेळे वांकी गर्जती खळाळें ६
राम सर्वांगि सुंदर चरणीं ब्रीदाचा तोडर ७
सुगंध परिमळ दुसरे झेपावती मधुकरें ८
गळां पुष्पांचीया माळा वामें शोभे भूमी-बाळा ९
स्वयंभ-सुवर्णाचि कास पुढें उभा रामदास १०

२

धनुष्य बाण काय केलें कां कर कटावरि ठेविले १

णी. २ सुंदर.

हा कां धरिला अबोला दिसे वेष पालटिला २
किलकीलाट वानरांचे थवे दिसेना तयांचे ३
पंढरीसी जहालें येणें येक्या हनुमंता-कारणें ४
दिसे हनुमंत एकला सैन्या-मधुनी फुटला ५
रामीं रामदास भाव तैसा होय पंढरीराव ६

३

जहाले अजन्माचे पोटीं मिथ्या म्हणतां फोडी घांटी. १
नवल नवल सावज काय सांगों मी हें चोज २
तयासि मारूं जातां पाहे जीवा-हाणी होत आहे ३
रामीं रामदास वर्म कळेना तयाचें हो कर्म ४

४

आत्मारामाविण रीतें स्थान नाहीं अनुसरतें १
पहातां मन बुद्धि लोचन रामेंवीण दिसे ओंन २
सवडी नाहीं तीर्थ-गमना रामें रोधिलें त्रिभुवना ३
रामदासीं तीर्थ-भेटी तीर्थ रामेंहुनी उठी ४

५

रूप रामाचें पहातां मग कैंचीरे भिन्नता १
दृश्य दृश्यासिं वेगळा राम जीविंचा जिव्हाळा २
वेगळीक पहातां कांहीं हें तों मुळींच रे नाहीं ३
रामदासीं राम होणें तेथें कैंचें रे देखणें ४

६

१ पटकी.

वेळे पाउस पडेना नासकवणी उघडेना १
ऐसे कुळवाडी यांचें भंड दुःख जहालें उदंड २
बहुपडिं आलें शेत रेडयापाडयाचें आउत ३
कांहीं केल्यानें पीकेना धान्य वेळेसि विकेना ४
फाळा लाविला उदंड अवघें जहालें थोतांड[1] ५
वारीं रोगांची वाजती नाना आभाळें फिरती ६
टोळ पक्षी मुषकादिक खाति श्वापदें आणिक ७
दावेदारांची यातना चोराचोरा राहवेना ८
नित्य पोटाचे मजुरे वेगीरवालीं[2] नीघे धुरें ९
घर खोपट मोडकें एक फटकुर फाटकें १०
बहुरोगें गुरें गेलीं धारणीनें मुलें मेलीं ११
सर्व संसार बुडाला दास म्हणे जोगी झाला १२

७

वड पिंपळ वाढले बहुसाल[4] विस्तारले १
तरि ते जाणावे निर्फळ त्याचें खातां नये फळ २
नानावृक्ष फळें विण परि ते जाणा निःकारण ३
रामदास म्हणे विचार नसतां तैसे होति नर ४

८

चित्त देउनी ऐकारे पोहणार पडिला धोरे १
मन सुळ्याच्या वीवटें वाहे जीवन उफराटें २

१ गप्पा. २ बिगारीखाली. ३ कीस. ४ पुष्कळ. ५ ज्याठिकाणी नदी वगैरेचें पाणी अतिशय ओढत असतें त्यास म्हणतात.

उगमासीं संगम झाला रामदासीं वाढ्वनि बाला ३

९

बरें चांगलें आणि गोडें ऐकतांचि पुरे कोडें १
अभिमाना-पैलीकडे मन बुद्धिसी नातुडे २
रामदास म्हणे साचें मूळस्थान या जन्माचें ३

१०



## सख्य

### पंचक.

एक लक्ष हीनमणी[1] तृप्त होतसे कमळिणी १
तैसा देव आहे दुरी परि तो भक्तांचे अंतरीं २
दोन लक्ष निशामती[2] जेणें चकोर तृप्त होती ३
रामदास म्हणे घन देता चातका जीवन ४

१

बाळक जाणेना मातेसी तिचें मन त्यापासीं १
तैसा देव हा दयाळ करी भक्तांचा सांभाळ २
धेनु वत्साचेनी लागें धांवे त्याच्या मागें मागें ३
पक्षी घेतसे गगन पिल्यांपासीं त्याचें मन ४
मत्स्य आठविता पाळी कूर्म दृष्टिनें सांभाळी ५
रामीं रामदास म्हणे मायाजाळाचीं लक्षणें ६

२

१ सूर्य. २ चंद्र.

बाळपणीं लोभ करी माता नाहीं जन्मवरी १
तैसा देव हा दयाळ सदापाळ सर्वकाळ २
मना सारिखें न होतां बाळकासि मारी माता ३
दास म्हणे सांगों किति बाप लेंकांसि मारिति ४

३

माय-बाप सांभाळिती लोभा-कारणें पाळिती १
तैसा नव्हे देव-राव त्याचा कृपाळु स्वभाव २
चंद्र-सूर्य मावळती घन आकाशीं होरपती ३
रामीं रामदासी भाव केली संसाराची वाव ४

४

एक सहस्र कोटी-वरी जहाली अन्यायाची परी १
तरी देव उपेक्षिना कधीं निष्ठुर होईना २
शरणागत भांबावले भजन देवाचें चुकलें ३
रामीं रामदास म्हणे सर्व-गुणें भक्ति-उणें ४

५



## संवाद

### पंचक.

तुज कैसें पाहूं देवा तुझी कैसी करूं सेवा १
बहुदेव पाहुनी आलों बहु रूपीं भांबावलों २
किति देवळें मोडिती किति देव भंगोनि जाती ३
बहुतांच्या बोलें गेलों तेणें बहुत कष्टलों ४

रामीं रामदास म्हणे ऐशीं जनाचीं लक्षणें ५

१

देव म्हणे मी जात नाहीं आतां चिंता न करिं कांहीं १
मज पाहावें संतांपासीं शेविं जाणत्या भक्तासीं २
मज जाणावें विचारें सगुणाचें भजन-द्वारें ३
देव म्हणतो दासासी रे मी आहें तुजपासी ४

२

माझीं ब्रीदें कां विसरतां आणि व्यर्थ कां चेष्टतां[१] १
भक्तवत्सल दीनानाथ तुम्हां आधार समर्थ २
भय दाखवि अनिवारी तोचि सर्व-चिंता करी ३
दासासमीप राहातों योगक्षेमही[२] वाहतों ४

३

मज गांजिलें तें साहे परि भक्तांचें न साहे १
माझ्या भक्तां दीण[३] द्यावा मग मजसी त्यांसी दावा २
मज अवतार घेणें माझ्या भक्तांची-कारणें ३
निजदासांसी पाळावें दुर्जनासीं निर्दाळावें ४

४

आतां बोलावें तें किती मनीं पाहावी प्रचिती १
तुम्हां संकटाचे वेळे काय झांकितों मी डोळे २

१ चेष्टा करतां. २ योग म्हणजे दुर्लभ वस्तू प्राप्त करून घेण्याची शक्ती आणि क्षेम म्हणजे याचें रक्षण – ह्यास किंवा चरितार्थास म्हणतात. ३ जो भक्तांचा छळ करील त्याशीं.

सेवकाचा साभिमान समर्थाचें हें लक्षण ३
देव म्हणे दासजनीं चिंता न धरावी मनीं ४
५
रे मी भक्तांचा कोंवसा मनीं धरावा भरंवसा १
समर्थाचीये सेवका काय करवेल रंका २
कोप येतांचि तेघडी घेईन काळाची नरडी ३
दास सांभाळावे सदा मज आणिक नाहीं धंदा ४
६
काय गावारे गांव आम्हा नाहीं सर्व ठाव १
बोध-मृदंग फूवका ताळ द्वैताचा तुटका २
दास वेडे हो बागडे नृत्य करिति देवापुढें ३
राम-भेटीचा समय रामदासीं सांगतां नये ४
७

## अर्थसार्थक
## पंचक.

पक्षि श्वापद कीडा मुंगी पराधीन जीणें जगीं १
तैसा नव्हे नरदेहो करा भक्तिचा उवला हो २
नीच योनी चारी खाणी अवघे पराधीन प्राणी ३
रामीं रामदास म्हणे ज्ञान ध्यान परत नेणें ४
१

ीमें जडलेला .

पाप-पुण्या समता घडे तरिच नरदेह जोडे १
याचें सार्थक करावें आपणासि उद्धरावें २
बहु-जन्माचे शेवटी नरदेह पुण्य-कोटी ३
रामदास म्हणें आतां पुढतीं न लागे मागुता ४

२

देह-आरोग्य चालतें भाग्य नाहीं त्या-परतें १
लाहो घ्यावा हरि-भक्तीचा नाहीं भरवंसा देहाचा २
देह आहे क्षणभंगुर तुम्ही जाणतां विचार ३
रामीं रामदास म्हणे अकस्मात लागे जाणें ४

३

देश-काळ वर्तमान असे अवघाचि अनुमान १
भक्ति करावी देवाची घडी जातसे सोन्याची २
काळ वेळ ची पहातो सदा सन्निध राहातो ३
रामीं रामदास म्हणे देहा आहे जाई लेणें ४

४

पुढें होणार कळेना समाधान आकळेना १
मना सावधान व्हावें भजन देवाचें करावें २
रिणानुबंधाचें कारण कोठें येईल मरण ३
रामीं रामदास म्हणे भजनें अमरचि होणें ४

५

---

१ छंद.

## सुंदर पंचक.

म्हणे मी एक चांगला शब्द ठेवी पुढील्याला १
नाक नाहीं कान नाहीं जिव्हा नाहीं डोळे नाहीं २
हात लुले पाय लुले अवघे दांत उन्मळले ३
अवगुणी कुलक्षणी दास म्हणे केली हाणी ४

१

ज्ञानावीण निर्नाशिक नये संतांचे सन्मुख १
असो इंद्रियें सकळ काय करावीं निर्फळ २
नाहीं कथा-निरूपण हेची बधीर श्रवण ३
नाहीं देवाचें वर्णन तगे तेंचि मुकेपण ४
नाहीं पाहिलें देवासीं अंध म्हणावें तयासीं ५
नाहीं उपकारीं लाविले अहो तेची हात लुले ६
नाहीं केलें तीर्थाटण व्यर्थ गेले ते चरण ७
नाहीं काया झीजविली प्रेतरूपची ऊरली ८
नाहीं देवाचें चिंतन मन हिंडे जैसें श्वान ९
नाहीं परमार्थ बोलणें जिव्हा नाहीं तेणें गुणें १०
दास म्हणे भक्तीवीण अवघें देहीं कुलक्षण ११

२

अवघा डोंगर जळाला आहोळोनी काळा झाला १
तरी तेथें बहू रंग तैसें अवघें हें जग २

१ पडले. २ ज्ञान, नाशीक नाहीं ज्यास तो. ३ करून.

# व्यर्थ

## पंचक.

आतां सांभाळा आपुला  पाहूं जातां काळ गेला  १
आतां हीन कोणे वेळे  पुढें होणार नकळे  २
देहालागीं नानापरी  कष्ट केले जन्मवरी  ३
केलें देहाचें भजन  परी देह झाला क्षीण  ४
देहालागीं जीवें-भावें  वय वेंचलें अवघें  ५
म्हणे रामीं रामदास  केला आयुष्याचा नाश  ६

१

वय झालें वायांहात  अविचारें केला घात  १
देव नाहीं वोळखिला  पुढें विषय देखिला  २
बाळपण मूर्खपण  कांहीं नेणे हो आपण  ३
होतां तारुण्याचा भार  पुढें झाला कामातुर  ४
वृद्धपणीं संकोचित  देह जहाला गलीत  ५
रामीं रामदास म्हणे  जन्म गेलें मूर्खपणें  ६

२

---

१ अंतःकरणापासून. २ सर्व. ३ नाश. ४ अशक्त.

देहालागीं कष्ट केले परि ते अवघे व्यर्थ गेले १
देह देवाचे कारणीं होतां देव होय ऋणी २
आणी लोभें गुंडाळला पुढें अंतकाळ आला ३
जेजे कांहीं कष्ट केले ते ते अवघे व्यर्थ गेले ४
नाना परी सांभाळिली पुढें काया हे जाळिली ५
दास म्हणे मूर्खपण पुढें जन्मासीं कारण ६

३

शत वर्षांची मर्यादा तितुका व्यर्थ गेला धंदा १
देह संसारीं ओविला[1] नाहीं देह आठविला २
काया वाचा मनोभावें अवघें प्रपंचीं लावावें ३
नीचसेवकाचेपरी सेवा केली जन्मवरी ४
दास म्हणे विषय गोडी अंतकाळीं कोण सोडी ५

४

देव संसारीं घालीतो अंतकाळीं सोडवितो १
तया देवासीं चुकले आणी लोभें भांबावले[2] २
केलें जेणें चराचर[3] देव विश्वासी आधार ३
देव जीवाचें जीवन देव बंध-विमोचन[4] ४
देव सर्वांचे अंतरीं सांभाळितो निरंतरी ५
रामीं रामदास म्हणे जयाचेनी धन्य होणें ६

५

१ओविला. २भ्रमिष्टझाले. ३ चर-अचर-मनुष्य-पक्षी-काष्ठ-पाषाणआदिक-रूपसृष्टी. ४ बंधनसोडविणारा.

अवघेचि बोंबलती होळी भोंवते भोंवती १
माया होळी प्रज्वळली सृष्टि वेढारें लाविली २
ज्याकारणें गुंडाळती तेंचि वाचे उच्चारिती ३
होळीमध्यें खाजें[1] आहे तें तूं विचारूनि पाहें ४
खाजें खातां सुख होये परी कठीण हाता नये ५
खोल दृष्टीनें पाहिलें खाजें त्याच्या हाता आलें ६
एक उडी घालूं जाती लंडी चुकोनी पडती ७
एक देहाचे पांगले तेचि आगीं हुर्पळले[2] ८
उडी अवघ्यांचीच पडे परि तें हातास न चढे ९
एकें थोर धीर केला खाजें घेऊनि पळाला १०
एक आपणची खाती एक सकळांनें वांटिती ११
एक घेउनी पळाले तव त्यावरि पडे जाळें १२
रामीं रामदास होळी केली संसाराची धुळी १३

१

अझूनी कायरे दुश्चिता सावधान होईं आतां १
नागविलें योनिद्वारें म्हणूनि बोंबलती पोरें २
सकळ नाडियेलें वोजें अवघी एक बोंब गाजे ३
धुळी टाकिली मस्तकीं कोणी दाद देईना कीं ४
रोडी ऐसे नर्क होती म्हणोनि प्रत्यक्ष दाविती ५

१ खजूरखारीकइत्यादि मधुरपदार्थ. २ चिरवळासारखे.

धरुनीं अकस्मात नेती अवचीं कौतुकें पहाती ८
तेथें असेना मर्यादा थोर करीती आपदा ९
घरोघरीं फेरे करिती तैशा होती पुनरावृत्ती १०

२

ध्यान विषयाचें तुटावें म्हणुनी हरीकथे जावें १
ऐसी हेची कथा गावी तरितें धावणें नागवी २
विषयासीं कंटाळले म्हणुनी हरिकथे आले ३
विषयध्यान सांडावया आलों कीर्तनाच्या ठाया ४
काम क्रोध मज पासीं म्हणोनि आलों हरिकथेसीं ५
रामीं रामदास म्हणे वाद सांडूनियां नेणें ६

३

हरिकथा-निरूपणें तेणें लागलें भांडणें १
अमृताचें विष झालें हें तो प्रचितीसी आलें २
चिंतामणी चिंता करी परिस जाहला भिकारी ३
आनंदानें दुखविलें काम क्रोधें नागविलें ४
कल्पतरूचा फणसा एकाएकीं भरला कैसा ५
रामीं रामदास म्हणे हानि झाली निरूपणें ६

४

बोधीचे आरंभीं वंदूं विनायक बुद्धीदाता एक लोकांमध्यें १
लोकामध्यें बुद्धीवीण कामा नये बुद्धीचा उपाय सर्वांसीं २
सर्वांसी बुद्धी देतो गणनाथ करीतो सनाथ अनाथासी ३
अनाथा नाथाचा नाथ केला जनीं तो हा धरा ध्यानीं लंबोदर ४
लंबोदर विद्या-वैभव परता दास म्हणे माता सरस्वती ५

१

नमूं योगेश्वरी शारदा सुंदरी श्रोता प्रश्न करी वक्तयासी १
वक्तयासी पुसे जीव हा कवण शीवाचें लक्षण सांगा मज २
सांगा मज आत्मा कैंचा परमात्मा बोलिजे अनात्मा तो कवण ३
कवण प्रपंच कोणें केला संच मागुता वीसंच कोण करी ४
कोणते अविद्या सांगे जो जी विद्या कैसें आहे आद्य स्वरूप तें
स्वरूप ते माया कैसी मूळ माया ईसीं चाळवया कोण आहे ६
आहे कैसें शून्य कोणतें चैतन्य समाधान अन्न तें कवण ७
कवण जाणता कवणाची सत्ता मोक्ष हा तत्वता कोण सांगा ८
सांगा ब्रह्म खूण सगूण निर्गुण पंचवीस प्रश्न दासें केले ९

२

नमूं वेदमाता नमूं त्या अनंता प्रश्न सांगों आतां श्रोतयाचे १
श्रोतयाचे प्रश्न जीव हा अज्ञान जया सर्व ज्ञान तोची शीव २
शीवापर आत्मा त्या पर परमात्मा बोलिजे अनात्मा अनिर्वाच्य
वाच्य हा प्रपंच माईक जाणावा घडामोडी देवापासूनियां ४
विषय अविद्या त्यागावी ते विद्या निर्विकल्प आद्या तेंची रूप

१ सरस्वती. २ जोड.

ओळखावा परिओळखतां नये म्हणोनि उपाये साधुसंग ८
साधु-संग धरिं श्रवण विवरी सारासार करी विचारणा ९
विचारणा करि देवा निर्गुणाची आणि सगुणाची उपासना १०
उपासना कर्म हो आधिं पाळावें मग सांभाळावें ब्रम्हज्ञान ११
ब्रम्हज्ञान नसे तें जन आंधळें सन्मार्गि पांगुळें कियाभ्रष्ट
कियाभ्रष्ट कर्म-उपासनेविण नेणातां निर्गुण सर्व मिथ्या १३
सर्व मिथ्या जंव ब्रम्हज्ञान नाहीं किया कर्म काहीं सोडविना
सोडविना कर्म या कर्मापासोनी भगवंता वाचोनी तारांबळी
तारांबळी झाली देवासि नेणतो कर्मि गुंडाळितां देव कैंचा
देव कैंचा भेटे कर्म उरे पुढें संशयची वाढे सर्व काळ १७
सर्व काळ गेला संदेहीं पडतां नित्य चोरवाळितां कलिवर १८
कलिवर काय नित्य धूत गेला लावितो कोणाला उपकार १९
उपकार कैंचा सेवक देहाचा आणि कुटुंबाचा भारवाही २०
भारवाही झाला देवासि चुकला लौकिकचि केला जन्मवरी
जन्मवरी केलें अंतिं व्यर्थ गेलें कासाविस झालें वायाविण
वायाविण काळ गेला किं निर्फळ कर्म हें सबळ सुटेना कीं
सुटेना कीं कर्म कोण सोडविता सोडुनि अनंता कर्मे केलीं २४
कर्मे केलीं देह चालतां निर्मळ खंगतां ओंगळ देह झाला २५
देह झाला क्षीण सदा हगवण मृत्तिकेचा शिण कोण करी
कोण करी तेव्हां कर्माचें पाळण झाली भणभण शरीराची २७

शरीराची जेव्हां झालि भणभण तेव्हां नारायण भजों पाहे
भजों पाहे तेव्हां नारायण कैंचा गेला अभाग्याचा व्यर्थ काळ
व्यर्थ काळ गेला देवा न भजतां देह चोरवाळीतां चोरवाळेना
चोरवाळिला देही वाढला संदेही अंतकाळिं पाही दैन्यवाणा ३१
दैन्यवाणा पाहे देवा न भजतां पाहा तुला आतां कोण सोडी ३२
कोण सोडि देव धुंडिल्या वांचुनी म्हणोनी भजनी सावधान
सावधानपणें देवासि शोधावें तेणेंचि साधावें परलोक ३४
परलोक साधे संताचे संगती चुके अधोगती गर्भवास ३५
गर्भवास चुके ज्ञान अभ्यासितां वस्तुसि पाहतां वस्तुरूप
वस्तुरूप होणें विवेकाच्या गुणें नित्य निरूपणें सारासार
सारासार घडे असाराचा त्याग योगिया निःसंग सहजची
सहजची कर्मापासुनि सुटला बोधें विनटला परब्रम्हीं ३९
परब्रम्हीं हेतु लागतां अहेतु देहें देहातीतु रामदास ४०

११२

कर्में चित्त-शुद्धि होउनियां गेली मग उपासली उपासना १
उपासना-मिसें देव ठाईं पडे संदेहाचि उडे एकसरा २
एकसरा पंथें सांपडे सुगम जैसे विहंगम फळावरी ३
फळावरी झड जातां अनायासी निर्फळ असोसी वायावीण
वायांविण शीण कासया करावा निर्फळ जाणावा संसार हा ५
संसाराचा सोस कर्मी निजध्यास तेणें जगदीश अंतरला ६

अंतरला देव अंतरीं नद्यावा विवेक पाहावा सज्जनाचा ७
सज्जनाचा योग सर्वांचा वियोग आणि त्याचा त्याग चमत्कारें
चमत्कारें त्याग तत्व-विहरणें शीघ्रचि पावणें मोक्षपदीं ९
मोक्षपदीं ज्ञान रामदासीं झालें बंधन तुटलें संशयाचें १०

११३

संशयाचें कर्म संशयिं पडिलें तें कोणें सोडिलें ज्ञानेविण १
ज्ञानेविण देव कैंचा ठायिं पडे अज्ञानें बापुडें गुंडाळलें २
गुंडाळले सर्व लौकिकाकरितां लौकीक पाहतां उद्धरेना ३
उद्धरेना लोक हे कोणि कोणासी व्यर्थचि देवासी अंतरावें ४
अंतरावें व्हावें बहुत आधीन बहुतांचें मन राखवेना ५
राखवेना मन बहुता जनाचें आणि सज्जनाचें वर्म चुके ६
वर्म चुके कर्म आडवेंचि आलें नाहीं वोळखिलें आत्मयासी
आत्मयासी जाणे तोचि एक भला संसारिं सुटला विवेकानें ८
विवेकानें लाभ पावावा आपुला लौकीकें देवाला सोडुं नये ९
सोडुं नये ज्ञान सगुणिं भजणें भक्ति निवेदनें वोळखावी १०
वोळखावी भक्ति सायुज्यता मुक्ती येणें होय गती दास म्हणे

११४

अस्थिचा विटाळ होतां स्नान केलें चुडे दातवलें कासयासी[1]
आचमन करावें शूद्राच्या विटाळें हाडाचे चौडाके कोण जाणे २
नदीचे प्रवाहिं आंत पाहों नये स्नान संध्या होये अग्रोदकीं ३

---

१ गर्दित.

ओले चर्मि दूध होत आहे हिंग स्वयंपाकीं सांग सेविताती ४
रामदास म्हणे हे कोणि नपाहे देह मूळीं आहे विटाळाचा ५

११५

विटाळाचा देह विटाळें वाढला तुवां शुद्ध केला कोणेपरी १
पातकाचा देह पातकें वाढला विचारितां आला प्रत्ययासी २
अस्थिन्चा पंजर चर्मे गुंडाळिला विष्ठेनें भरला मळमूत्रें ३
जंत किडे ओक आंतडि कातडीं बाह्यात्कारीं वेडीं भादरलीं
भादरले केश मागुति निघती पुन्हा भादरती लागवेगें ५
भादरिली डोयि घेत प्रायश्चित अपानिं घासित मृत्तिकेसी
भादरीली डोई पळाला विटाळ मागुता चांडाळ भादरितो ७
बरा शुद्ध केला पुन्हा पापि झाला पुन्हा भादरिला सावकाश ८
सावकाश काहीं विचार पहावा जेणें करीं देवा पाविजेतो ९
पाविजेतो देवा भक्तिनिवेदनें शुद्ध ब्रम्हज्ञानें रामदासीं १०

११६

पोट भरावया मांडिला उपास झाला कासाविस रामाविणें १
राजा पहावया प्रजा धुंडाळितो कासाविस होतो वाउगाची २
द्रव्य साधावया निर्द्रव्याचा संग तेथें केंचें मग द्रव्य मिळे ३
ब्रम्ह साधावया कर्मामागें गेला तंव कर्में केला कासाविस ४
सुटिका व्हावया बंधनचि केलें तेणें ते सुटले केविं घडे ५
केविं घडे दृढरोगें आरोग्यता कुपथ्यानें व्यथा वाढतसे ६

एका व्यथा एकिं औषध घेतलें दास म्हणे झालें तयापरी ७

११७

चित्त आहे कैसें मळिण तें कैसें रुद्ध होतें कैसें विचारावें १
वैद्य ओळखिना रोगहि कळेना औषध मिळेना प्रचितिचें
अनुमानें देव अनुमानें भक्त अनुमानें मुक्त आनुमानी ३
अनुमानें केलें अनुमानें कल्पिलें निर्फळ जाहलें सर्वकाहीं
सर्व काहीं बरें प्रचिति आलिया दास म्हणे वायां अप्रचिती

११८

प्रचितीचा देव प्रचितीचा भाव करावा उपाव सप्रचित १
प्रचितीचा वैद्य प्रचितीचि मात्रा प्रचीतीच्या मंत्रा पाठ कीजे २
प्रचितीनें कोणिएक तें पाहावें जन ओळखावें प्रचीतीनें ३
प्रचीतीनें इष्ट प्रचीतीनें मित्र प्रचीतीने सूत्र कोणि एक ४
कोणिएक काय प्रचीती उपाय दास म्हणे सोय प्रचितिची ५

११९

प्रचिती वेगळें मिथ्या सर्व काहीं निर्फळचि पाहीं अप्रचिती
अप्रचिती जेथ फळ कैंचें तेथ निर्फळचि व्यर्थ कासाविस २
प्रचीतीची रीज जयाअंगीं नसे व्यर्थ हेंचि पिसें लोभाविणें ३
लोभाविणें लाभ मानिला सुलभ लाभ नाहीं क्षोभ प्रगटला
प्रगटला लोभ केलें निरर्थक प्रचीती सार्थक दास म्हणे ५

१२०

होते आठवण तेंचि अंतःकर्ण आतां सावधानमनें ऐका १
संकल्प विकल्प होय नव्हे वाटे तेंचि मन खोटें कल्पनिक २
होय नव्हे ऐसा अनुमान झालें निश्चयचि केला तोचि बुद्धी
निश्चयचि केला तयाचें चिंतन तेंचि चित्त जाण निश्चयेंसी ४
अहंकारासवें देह चालताहे दास म्हणे पाहें अनुभवें ५

१२१

करावें तें काय तेणें होतें काय अनुमानें काय प्रत्यय होतो
प्रत्यय होतो काय ऐसेंहि कळेना नये अनुमाना सर्व काहीं २
सर्व काहीं एका आत्मज्ञानाविण दिसताहे शीण बापुडाची
बापुडाची लाभ प्रचिती केवळा उणाचि आगळा दिसताहे
दिसताहे फळ लोकचि म्हणती आपुले प्रचिती काहिं नाहीं
काहिं नाहीं पूर्वजन्मिचें स्मरण होय विस्मरण सर्व काहीं ६
सर्व काहीं मागें जाहालें कळेना म्हणोनि फळेना केलें कर्म
केलें कर्म कोणें कोणासि पुसावें अनुमानें व्हावें कासाविस ८
कासाविस झाला कर्में जाजावला व्यर्थ श्रम गेला अंतकाळीं
अंतकाळीं गेला सर्व सोडुनियां भ्रमला प्राणि या विस्मरणें
विस्मरणें जाय सद्गुरु करितां दास म्हणे आतां गुरु करीं ११

१२२

प्रत्ययाचें ज्ञान तेंचि तें प्रमाण येर अप्रमाण सर्व काहीं १
सर्व काहीं धर्म आणि कर्माऽकर्म चुकलिया वर्म व्यर्थ जाती

व्यर्थ जाती जन्म ज्ञानावाचुनियां केले कष्ट वायां निरर्थक ३
निरर्थक जन्म पशूचिया परी जंव तें अंतरीं ज्ञान नव्हे ४
ज्ञान नव्हे सोपें तें आधिं पहावें शाश्वत शोधावें दास म्हणे ५

१२३

आई आधिं पुरुष हेंचि विचारावें आपुलें करावें समाधान १
समाधान होय देव देखिलिया देवाविण वायां शिणों नये २
शिणों नये देव असोनि सर्वत्र हें तों देह-यंत्र नाशिवंत ३
नाशीवंत देहो नाहीं त्या संदेहो दास म्हणे पाहा हो परब्रंम्ह ४

१२४

ज्याचें नाम घेसि तोच तुं आहेसी पाहें आपणासि शोधोनियां
शोधितां शोधितां मीपणाचि नाहीं मीपणाचें पाहीं मूळ बरें २
मूळ बरें पांहिं न रानिं या राहा आहा तैसे आहा सर्वगत ३
सर्वगत आत्मा तोचि तुं परमात्मा दास अहमात्मा सांगतसे

१२५

सर्वांहोनि थोर देव निराकार मग हा विस्तार विस्तारला
विस्तारिला जन त्वां नानापरीचा निर्गुण पूर्वीचा देव आहे २
देव आहे सत्य येर हे असत्य जाणातिल्या नित्य विचारणा ३
विचारणा करि धुंडि नानापरी दास म्हणे तरी तरसील ४

१२६

पतीत म्हणिजे वेगळा पडिला पावन तो झाला एकरूप १

एकरूप देव आशेप गांईचा तेथें दुजा कैंचा कोण आहे २
कोण आहे दुजा स्वरूपीं पहातां विचारें पाहतां स्फरव आहे ३
स्फरव आहे मूळ आपुलें शोधितां मनासि बोधितां रामदास ४

१२७

तुकाई यमाइ नमू चंडाबाई जारवाइ जोरवाइ सटवाइ ते १
सटवाइ जगदंबा आदिशक्ति अंबा तुम्ही त्या स्वयंभा दारववावें
दारववावें तुम्हीं सर्व पैलिकडे देखतांचि घडे मोक्षपद ३
मोक्षपद घडे मोक्षासि पाहतां तद्रूपचि होतां दास म्हणे ४

१२८

नमूं राम कृष्णा आदिनारायणा तुम्हिं त्या निर्गुणा दारववावें
दारववावें निज स्वरूप आपुलें दिसेनासें झालें काय करूं २
काय करूं आतां देवा नरहरी पुढारी माझारी पांडुरंगा ३
पांडुरंगा देवा अगा महादेवा तुम्हीं मज द्यावा ठाव ब्रम्हीं ४
ब्रम्हीं ब्रम्हरूप तें मज करावें रामदास भावें प्रार्थितसे ५

१२९

सूर्यनारायणा देवा नमस्कार तुवां निराकार दारववावें १
दारववुन द्यावें निज जीववावें चंद्रा तुज भावें प्रार्थितसें २
प्रार्थितसें महि आणि अंतरिक्षा आम्हां त्या अलक्षा लक्षवावें
लक्षवावें मज आपोनारायणें ब्रम्हज्ञासि जाणें तें करावें ४
करावें सनाथ आजि प्रभंजनें[1] नक्षत्रें धरुणें दास म्हणे ५

१३०

1 वायूनें

तुम्हिं सर्वदेवीं मिळोनि पावावें मज वेगीं न्यावें परब्रम्हीं १
परब्रम्हीं न्यावें संत-अनुभवें मज या वैभवें चाड नाहीं २
चाड नाहीं एका निर्गुणा वांचुनी माझे ध्यानिं मनिं निरंजन ३
निरंजन माजा मज भेटवावा तेणें होय जीवा समाधान ४
समाधान माझें करा गा सर्वहो तुम्हासि देहहो विसरेना ५
विसरेना देहो चालतो तंवरी बाह्यअभ्यंतरीं दास म्हणे ६

१३१

तुं काय झालासि अगा निरंजना आम्हां भक्तजना सांभाळावें
सांभाळावें सदा सबाह्याभ्यंतरीं आम्हां क्षणभरी सोडुं नको
सोडुं नको वायां गुप्त कां झालासी देवा देखिलासि संतसंगें ३
संतसंगें गुप्त होउनि पाहिला संग त्याग झाला दर्शनेंची ४
दर्शन जाहलें तेंचि तें जाणलें नसोनि आसलें कल्प कोडी ५
कल्पकोडी जोडी झालि निर्गुणाची दास म्हणे कैंचि देहबुद्धी

१३२

देवेंविण आनां मज कंठवेना कृपाळु तो नानाठाईं वसे १
नानाठाईं देव आहे जेथें तेथें तयाविण रीतें स्थळ नाहीं २
स्थळ नाहीं रितें ब्रम्ह तें पुरतें जेथें जावें तेथें मागें पुढें ३
मागें पुढें ब्रम्ह सर्वत्र व्यापक दास तो निःशंक तेणें गुणें ४

१३३

देव निर्विकार त्या नाहिं आकार तरि हा विस्तार कोणें केला १

कोणें केला ऐसा शोधुनि पाहावें पाहोनि राहावें समाधान २
समाधान घडे विचार पाहतां बुजोनि राहतां सर्वकाळ ३
सर्वकाळ पूर्वपक्ष हो सिधांत वेदांत धादांत सप्रचिती ४
सप्रचिति तरि विकारीं विकार देव निर्विकार जैसा तैसा ५
जैसा तैसा आहे विवेक पहावा पडों नये गोंवा दास म्हणे ६

१३४

नमूं वेदमाता जेकां सर्व सत्ता ब्रम्हज्ञान आतां बोलूं कांहिं १
बोलूं कांहिं ब्रम्ह जेणें तुटे भ्रम आणि सुखें वर्म हाथिं पडे २
हाथीं पडे देव आणि भावाभाव प्रकृति स्वभाव सर्वकाहिं ३
सर्व काहिं कळे संदेह मावळे अंतर निवळे साधकाचें ४
साधकाचें हित होय निरूपणें श्रवण-मननें दास म्हणे ५

१३५

श्रवण करावें जें तें ब्रम्हज्ञान ज्ञानेविण शिण कामा नये १
कामा नये येथें सारासार नाहीं कथेच्या प्रवाहीं कोण साध्य २
साध्य तेंचि घ्यावें येर तें सोडावें विचाराचे नावें जेथें शून्य ३
जेथें शून्य ज्ञान सर्व अनुमान अनुमानें धन्य होइजेना ४
होइजेना धन्य निरंजनेंविण रामदास खुण सांगतसे ५

१३६

राम कैसा आहे हें आधिं पाहावें मग सुखें नावें दास्य करूं १
दास्य करू जन देव वोळखेन देवासि चुकोन दास्य कैसें २

दास्य केसें घडे देवासि नेणतां वाउगें श्रमतां शिणउरें ३
शिणउरे साध्य तें काहिं साधेना अंतरिं वसेना समाधान ४
समाधान देव पाहतां घडेल येर विघडेल रामदास ५

१३७

शोधुनि पाहावें देव-ऋषि-मूळ निर्माण सकळ कोठुनियां १
कोठूनियां झालि सर्वहि उपाधी वरि घ्यावि शुद्धी शाश्वताची २
शाश्वताची शुद्धी घेतां दृढ बुद्धी होयोनि समाधी ज्ञाता चढे ३
ज्ञाता चढे सर्व वेद-शास्त्र-बीज मुख्य गुह्य गुज योगियांचें ४
योगियांचें गुज सहजि सहज दास म्हणे निज हाथिं पडे ५

१३८

देव तो कळेना साहिला चुकोनि संसार येऊनि काय केलें १
काय केलें बापा आपुलें अनहित देखत देखत चुकलासी २
चुकलासी धनि या भूमंडळींचा सर्वहि देवांचा मुख्य देव ३
मुख्य देव आहे तो तुज कळेना शाहाणा आपणा म्हणविशी ४
म्हणविशी परि दुसऱ्याचें सोनें उणें कोठि सुणें दास म्हणे ५

१३९

शाहणे दिसतां ब्रम्हज्ञानेविण संसाराचा शीण करोनियां १
करोनि संसार रात्रंदिवस धंदा कैसे हो गोविंदा चुकलेती २
चुकलेति बाबा तुम्ही कां बंधें हो अंतरिं संदेहो जन्मवरी ३
जन्मवरी वोझें वाहिलें वाउगें व्यर्थ काम-रंगें रंगोनियां ४

रंगोनियां कामीं अंतरावें रामीं दास म्हणे ऊर्मि[1] कामा नये ५

१४०

नवस पुरवी तो देव पूजिला लोभालागीं झाला कासाविस १
कासाविस झाला प्रपंचाकरितां सर्वकाळ चिंता प्रपंचाची २
प्रपंचाचि चिंता करिताचि मेला तो काय देगला उपकार ३
उपकार केला पूर्वजांलागुनी ते गेले मरोनि पहातसे ४
पाहतसे पुढें आपणाचि मेला देवासि चुकला दास म्हणे ५

१४१

लोभ नवसांचा तो देव बद्धाचा आणि मुमुक्षाचा गुरु देव १
गुरु देव जाणा तया मुमुक्षाचा देव साधकाचा निरंजन २
निरंजन देव साधकाचे मनीं सिद्ध समाधानी देवरूप ३
देवरूप झाला संदेह तुटला तोचि एक भला भूमंडळीं ४
भूमंडळीं रामदास धन्य आहे अनन्यता पाहे शोधोनियां ५

१४२

तुजला तूं थोर मजला मी थोर तूं थोर मी थोर कामा नये १
कामा नये कोणालागीं मीतूंपण पाहा थोरपण ईश्वराचें २
ईश्वराचें रूप पहातां निवावें मीतूंपणा जावें सांडुनियां ३
सांडुनियां जाय तें काय आपणा शाश्वताच्या खुणा पाहें बापा ४
पाहें बापा देव कोण निरावेव दास म्हणे भाव तेथें देवीं ५

१४३

1 लहरी.

भाविला नजाये तेथें भाव देवीं परि हो गोसावि सांगतसों १
सांगतसों परि नये अनुमाना हें काहिं कळेना आम्हांलागीं २
आम्हांलागीं कळे तें काहीं सांगा हो गोसावी आहा हो भले तुम्हीं
भले तुम्हीं आहां मज उमजावें उकलुनी द्यावें सर्व काहीं ४
सर्व काहीं कळे सद्गुरु करितां दास म्हणे आतां गुरु करीं ५

१४४

गुरुविण प्राणि त्या होय जाचणी सत्य माझी वाणी मिथ्या नव्हे
मिथ्या नव्हे सत्य सांगतों तुम्हांला अंतिं यमघाला चुकेना कीं २
चुकेना कि यमयातना या जना वेगीं निरंजना ठायिं पाडा ३
ठायिं पाडा वेगिं देव निरंजन लावा तनमन सद्गुरुसीं ४
सद्गुरुसीं नाहीं जयाला वोळखी तया झोकाझोकी यातनेची
यातनेची चिंता तुटे एकसरीं वेगिं गुरु करीं दास म्हणे ६

१४५

ज्याचेनि जितोसि त्यासि चुकलासी व्यर्थचि झालासी भूमिभार
भूमिभार जिणे तुझें गुरुविणें वचनें प्रमाणें जाण बापा २
जाणें तूं हे गती गुरुविण नाहीं पडसि प्रवाहीं मायाजाळीं ३
मायाजळीं वायां गुंतलासि मूढा जन्मावरि वोढा तडातोडी ४
काहिं तडातोडि काहि देव जोडी आयुष्याचि घडी ऐसी वेचीं[१] ५
ऐसी वेचीं बापा आयुष्य वैयसा दास म्हणे ऐसा काळीं घाली ६

१४६

१ आयुष्यता.

सर्व काळ गेला संसार करितां तरि सार्थकता कैसी होय १
कैसी घडे मुक्ति कैसी घडे भक्ती म्हणोनियां चित्तीं गोष्टि धरी
गोष्टि धरी मनीं स्वहितालागुनी बैसा देवध्यानीं क्षणएक ३
क्षण एक गेला सुखाचा बोलतां तेणें काहिं चिंता वोसरेल ४
वोसरेल चिंता संसाराचि माया भजा रामराया दास म्हणे ५

१४७

प्रपंचि असोनि परमार्थ करावा बरा विवरावा निरंजन १
निरंजन देव प्रगटे अंतरीं मग भरोवरी करिना कां २
करिना कां परि संसार बाधिना परि तो साधेना काय करूं ३
काय करूं देवा लौकिका उपाय धरवेना सोय शाश्वताची ४
शाश्वताची सोय समाधान होय मोक्षाचा उपाय सद्गुरूची ५
सद्गुरूचि गति चुके अधोगती दास म्हणे मती पालटावी ६

१४८

संसार करावा सुखें यथासांग परि संत-संग मनीं धरा १
मनीं धरा संत-संगति विचार येणें पैलपार पाविजेतो २
पाविजे तो याचि प्रचिति पाहावी निरूपणीं व्हावी अति प्रीती
अति प्रीती बुद्धि निरूपणीं धरा संसारीं उद्धरा असोनियां ४
असोनिया नाहीं हे माया सर्वही विवंचुनि पाहीं दास म्हणे ५

१४९

करूनि अकर्ते होउनियां गेले तेणें पथें चाले तोचि धन्य १

तोचि धन्य जनीं पूर्ण समाधानी जनीं आणि वनीं सारिखाची २
सारिखाची जेथें तेथें पालटेना नये अनुमाना कोणि एक ३
कोणिएक लोक देहासि पाहाती अंतरींची गती कोण जाणे ४
कोण जाणे काय परावे मनिचें जनास जनीचें कळतसे ५
कळतसे परी अंतरीं शोधावें मनासि बोधावें दास म्हणे ६

१५०

समाधान व्हावें विवेकें पाहावें वायूच्या स्वभावें सर्व काहीं १
सर्व काहीं घडे वायूची करितां वायु पाहों जातां आढळेना २
आढळेना वायु आकाशीं विराला कर्ता काय झाला अंतरींचा ३
अंतरींचा सर्व विवेकें पाहतो ब्रम्हरूप आतां सहजची ४
सहजची झालें विचारानें केलें माणूस पाहिलें शोधुनियां ५
शोधुनियां जीत माणुस पाहावें वर्म पडे ठावें दास म्हणे ६

१५१

शरीराचीं तत्वें तत्वांचें शरीर पाहावा विस्तार विस्तारुनी १
विस्तारुनी गुणी तत्वांचि मांडणी सिद्धांतें जाणोनी आरंभावीं
आरंभावीं तत्वें तत्वें वेगळालीं मीपणा गळाली विवेकानें ३
विवेकें पाहतां कोणिच नादके समजतां कळे सर्व काहीं ४
सर्व काहीं लाभ होतो निरूपणें श्रवण-मननें दास म्हणे ५

१५२

माणुसाचें ब्रम्ह शोधितां होइल प्रचित येईल रोकडीच[1] १

१ वास्तविकपणें.

रोकडी प्रचीति होति गुरुमुखें फुका सर्व सुखें हाता येती २
हाता येती बीजें सज्जनाच्या गुजें प्रचीतीच्या भोजें आनंदला ३
आनंदला प्राणि सद्गुरु सेवितां क्षुधार्थी जेवितां जेवि तृप्त ४
तृप्त झाली बुद्धि निर्गुणाची शुद्धी लागली समाधी रामदासीं ५

१५२

आतां काहिं बोलों धालों तृप्त झालों विवेकें राहिलों परब्रम्हीं १
परब्रम्हीं जातां ब्रम्हचि तत्वता विचारें पाहतां आपणाची २
आपणची असे कोणिहि न दिसे संसाराचें पिसें वाव झालें ३
वाव झालें भय सर्व संसारीचें लाधलें हरिचें निज धाम ४
निज धाम बोधें विवेकें पाहावें दास जीवें भावें सांगतसे ५

१५३

आकाराचें सुख निराकारा नये निराकारिं काये पाहसील १
पाहसील सुख सुखामागें दुःख शोक अवश्यक अंगीं वाजे
अंगीं वाजे शोक एखादिये वेळीं सुख सर्वकाळीं सगुणाचें ३
सगुणाचें सुख नासोनि जायिल सगुण होईल नाहीं ऐसें ४
नाहीं ऐसें एक निर्गुण दिसतें रोकडेंचि तेथें काहिं नाहीं ५
काहीं नाहीं कैसें आहे घन दाट सर्वांचें सेवट परब्रम्ह ६
परब्रम्ह परि पाहतां दिसेना नये अनुमाना काहिं केल्या ७
काहीं केल्या नोव्हे पाषाणाचें सोनें तैसें हें अज्ञानें जाणिजेना ८
जाणिजेचि जनीं निज परब्रम्ह तंव कैंचा श्रम जाउं पाहे ९

जाउं पाहे मन ब्रंम्हासि पहाया तंव तेथें माया दिसताहे १०
दिसता हे माया तंव निरूपासी येरवीं मायेसी ठाव कैंचा ११
कैंचा ठाव तया माया-ज्ञानियासी रमीं रामदासीं संतसंग १२

१५४

ऐसा कोण आहे सुकियाचा जाण कळे वोळखण न सांगतां १
न सांगतां जाण अंतरींचा हेत पूरवी आरत सर्व काहीं २
सर्व काहीं जाणे चतुराचा राणा धन्य नारायणा लीला तुझी ३
लीला तुझी जाणे ऐसा कोण आहे विरंचि तो राहे चाकटला[1]
चाकटला मनु देवासि पाहतां दास म्हणे आतां हद्द झाली ५

१५५

स्वप्नीं देखिलें तें स्वप्नावरी गेलें जागृतीनें केलें तेंचि खरें १
तेंचि खरें होतें येर सर्व जातें तैसें ज्ञानियानें संसारीक २
संसार-मायेचा होइल विलय यावा चिंता काय दास म्हणे ३

१५६

चिंता काय आतां स्वप्निचे सुखाची सर्व चाले तेंचि ब्रंम्ह दिसे
खरें दिसे तरी ज्ञाते नमानिती दास म्हणे चित्तीं पालटेना

१५७

देव निराकार त्या नाहीं आकार आकार-संहार होत आहे १
होत आहे जें जें सर्वहि जाणारें जाणारें होणारें सर्व माया २
सर्व माया दिसे हें पंचभूतिक आत्मा आहे एक निरंजन ३

---

१ चकित झाला.

निरंजनीं जन वन काहिं नसे दृश्य भार भासे कल्पनेसी ४
कल्पनेसि भासे तें सर्व कल्पित कल्पनेरहीत परब्रम्ह ५
परब्रम्ह नाहिं ऐसा ठाव कैंचा धन्य तो देवाचा आत्मज्ञानी ६
आत्मज्ञानी नर पाहे सारासार पुढें तदाकार होत आहे ७
होत आहे जन्म सार्थक तयाचा जेथें सज्जनाचा अनुग्रह ८
अनुग्रह घडे बहुता सुकृतें साक्षात्कार जेथें रोकडाची ९
रोकडाची मोक्ष साधुचे संगती चुके अधोगती आत्मज्ञानें
आत्मज्ञानें होतें आत्मनिवेदन भक्तिचें लक्षण नवविधा ११
नवविधा भक्ति श्रवण करावी धारणा धरावी श्रवणाची १२
श्रवणाची स्थिति ब्रम्ह-निरूपण श्रवण मनन निजध्यास
निजध्यास नीजवस्तुचा धरावा विचार करावा आपुलाही १४
आपुलाहि ठाव ज्ञानें होतो वाव जाणते उपाव श्रवणाचे १५
श्रवणाचे भाव जाणते जाणती तिनिची प्रचीति ऐक्यभाव
ऐक्यभाव देव-भक्त-नामांकित अनन्य अनंत जैसा तैसा १७
जैसा आहे लाभ श्रवण-भक्तिचा तेथें विभक्तिचा ठाव नाहीं
ठाव नाहीं ऐसा श्रवणें जाणावें कीर्तन करावें हेंचि आता १९
हेंचि हें कीर्तन नित्य निरंतर येथाचें अंतर विवरावें २०
विवरावें जेणें तोचि तो जाहला रंक तो पावला राज्यपद २१
पदीं पद प्राप्त झालें संतसंगें सद्य अंतरंगें समाधान २२
समाधान झालें श्रवणें कीर्तनें रामाच्या स्मरणें चित्त-शुद्धी

चित्त-शुद्धी झाली जेणें तें धरावें सेवन करावें सद्गुरुचें २४
सद्गुरु करावा तें पादसेवन सद्गुरुनें ज्ञान होतअसे २५
होत आहे ज्ञान सद्गुरु करितां होय सार्थकता गुरुचेनी २६
गुरुचेनी पदें लोक ठायिं पडे सार तें निवडे प्रत्ययासी २७
प्रत्ययासी बोले तेंचि तें बोलणें अर्चन करणें गुरु-देवा २८
गुरु-देवालागीं कीजे नमस्कार साहावा विचार भक्ति ऐसी २९
सर्व-दास्य कीजे ते भक्ति सातवी सख्य ते आठवि भक्ति जाणा
नवविचें लक्षण आत्मनिवेदन सर्वदा अभिन्न परब्रम्हीं ३१
परब्रम्ह स्वयें आपणाचि होणें ऐसीं हि लक्षणें सार्थकाचीं ३२
सार्थक भजन आत्म-निवेदन विवेकें अभिन्न देव भक्त ३३
देव भक्त ऐसे हे आधीं पाहावें स्थितिनें राहावें सर्वकाळ
सर्वकाळ वस्तु आहे जैसी तैसी देह प्रारब्धासि समर्पिला
समर्पिला त्यासि होणार होइल जाणार जाइल पंचभूत
पंचभूत माया मायिक दिसते होते आणि जाते स्वप्नाकार
स्वप्नाकार माया आपण वेगळा असोनि निराळा सर्वांमध्यें ३८
सर्वांमध्यें परि सर्वां बाह्य आहे आहे तैसें आहे सदोदीत ३९
सदोदीत वस्तु तेंचि तें आपण रामदासीं खुण सांगतसे ४०

१५८

विटाळाचा देह विटाळ जाणतां शुद्ध करुं जातां कोणेपरी १
कोणेपरी आतां देह शुद्ध होइल विटाळ जाइल कैसा याचा

याचा अर्थ घेतां या नये रुद्रता रुद्र करूं जातां पुन्हा पापी
पुन्हा पापी झाले पुन्हा रुद्र केले आयुष्य वेचलें ऐशापरी ४
ऐशापरी देह सर्वदा खंडिला दास म्हणे झाला कासावीस

१५९

स्थानिकेचा ऐशा करी नाना परी माउता दंकारि नर्क तेथें १
नर्क तेथें आहे कैसा हा काढावा व्यर्थ वाढवावा लोकाचार २
लोकाचार केला लौकीकीं देखतां अंतरीं रुद्रता आढळेना
आढळेना ज्ञान पूर्ण समाधान सर्वदा बंधन संदेहाचें ४
संदेहाचें पाप झाला वज्रलेप विचार निष्पाप रामदासीं ५

१६०

प्रपंचिं तें भाग्य परमार्थी वैराग्य दोनी यथासांग दोहींकडे १
दोहींकडे सांग होता तो समर्थ नाहींतरी व्यर्थ तारंबळी २
तारंबळी होता विचारनसतां दास म्हणे आतां सावधान ३

१६१

बंधाचा मुमुक्षें प्रबोध करावा मग उद्धरावा ज्ञानमार्गें १
ज्ञानमार्गें द्यावें सत्य समाधान तरी मग जन पाठीं लागे २
पाठीं लागे त्याचें अंतर जाणावें आपुलें म्हणावें दास म्हणे

१६२

पतित हे जन करावे पावन तेथें अनुमान करूं नये १
करूं नये गुण-दोष-उठाठेवी विवेकें लावावी बुद्धि जना २

१ जातें इत्यादिका सटांकी लावण्याचें कसब करणारी एक जाति आहे.

बुधि सांगे जना त्यानाव सज्जन पतित-पावन दास म्हणे ३

१६३

महापापि लोक पूर्विचे आहेती तेचि पालटती जयाचेनी १
जयाचेनी योगें होनसे उपाय बुडति अपाय नानाविध २
नानाविध जन सुबुद्धचि होती साधुचे संगती दास म्हणे ३

१६४

लोखंडाचें सोनें परिसाचे गुणें साधुचेनि संगें बद्ध सिद्ध१
बद्ध सिद्ध होती देखतां देखतां होय सार्थकता तात्काळची२
तात्काळची झाला वाल्हा तो वाल्मिक दास पुण्यश्लोक रामनामीं

१६५

पावन असतां पतित झालासी सोय चुकलासी पावनाची१
पावनाची सोय धरितां अंतरीं स्वरुप विवरि समाधान २
समाधान झालें केलें पावनानें आत्मनिवेदनें दास म्हणे ३

१६६

आत्मनिवेदन नववें भजन येणे संतजन समाधानी १
समाधानी संत आत्मनिवेदन झालें मितुपण सांडवलें २
सांडवलें सर्व माइक संगासी रामी रामदासीं निःसंगता ३
निःसंगता झाली विवेकानें केली मुक्तिहि लाधली सायुज्यता४

१६७

आनांचि हे मुक्ति देहिं पावे जना तरि कां सज्जना शरण जावें१

शरण जातां भावें सज्जनचि व्हावें शीघ्र उद्धरावें निरुपणें २
निरुपणें निज वस्तु तें सांपडे गुज गर्यीपडे अकस्मात ३
अकस्मात ठाव नदिसे आपुला निरंजनि झाला निरंजन ४
निरंजन झाला ये जनीं असोनी उन्मनि गिन्मनी नाढळती ५
नाढळति तेथें कांहिं देहेभाव तत्वज्ञान वाव देहबुद्धी ६
देहबुद्धी गेली देखतां देखतां मीकोण हें आतां सांपडेना ७
सांपडेना शुद्धी मीपणें पाहतां तें मीपण जातां वस्तुरूप ८
वस्तुरूपबोधें अरूप होइजे विवेकाचि कीजे विचारणा ९
विचारणा झाली रामीं रामदासीं आतां या जन्मासी ठाव नाहीं
ठाव नाहीं ऐसें राघवाचें देणें थोराहुनि होणें थोर स्वयें ११

१६८

माझें थोरपण देव वाखाणिती ऐसी हे प्रचीती सिद्ध आतां
सिद्ध आतां बोध देखत देखतां होय सार्थकता शीघ्रकाळें २
शीघ्रकाळें काळ सर्व संहारिला अनुभव आला रोकडाची ३
रोकडाची आतां तुम्हिं तरी पाहा विवेकानें आहा काय नेणे
नेणो महिमान विवेकी-जनाचे होय सज्जनाचें मूळस्थान ५
मूळस्थान मूळ होइजे केवळ कोण रे चांडाळ मिथ्या बोले ६
मिथ्या बोलवेना पाहा विवंचना सिद्ध अनुमाना कैसी येते ७
कैसी येते आत्मप्रचीति आपण मी तु ऐसें कोण सांग बापा ८
सांग बापा मनीं बरें विचारुनी तत्वाचि झाडणी करुनियां ९

करुनियां पंचीकर्ण-विवरण पुढें मीं तूंपण कोठें आहे १०
आहे तैसें आहे प्रत्यक्ष जाणावें कोणासि म्हणावें काय आतां
काय आतां होतें बहु बोलोनियां घेतलेंसे जाया सर्व कांहीं
सर्व काहीं ऐसें हृदय जाइ जेणें माझें मीच जाणें कोणा सांगों
कोणा सांगों आतां हें कोण घेइल वायांची जायिल अभीमानें
अभिमानें सत्य राम कोपताहे सिद्धचि नलाहे आत्मरूपा१५
आत्मरूप स्वयें आपण नाव्हिजे तरि वायां कीजे रामदास१६

१६९

कदाकाळीं रामदासा उपेक्षिना राम-उपासना ऐसी आहे१
ऐसी आहे सार राघोबाची भक्ती भक्तिचि विभक्ती जेथें नाहीं
जेथें नाहीं काहिं वावुगें मायिक राम-उपासक दास म्हणे ३

१७०

मायिकाचि भक्ति उधाराचि मुक्ती तैसि नाहीं स्थिती राघवाची
राघवाची कृपा सध्या मोक्षफळ तुटे तळमळ चमत्कारें २
चमत्कार आतां जो कोणि पाहिना त्याचा पंथ उणा कोटिगुणें
कोटीगुणें उणें जिणें त्या नराचें तेथें विचाराचें वोस घर ४
वोसघरिं कोण कासयासि धांवे व्यर्थचि शिणावें कामाविण ५
कामाविण काम राहे आत्माराम जेथेंचि विश्राम पाविजेल६
पाविजेल परि विवरित जावें सर्वहि सांडावें वोळखोनी ७
वोळखतां त्याग सर्वांचा घडेल मार्ग सांपडेल योगियांचा ८

योगियांचा पंथ योगिच जाणती तिन्हींचि प्रचीति एक जेथें९
एक जेथें आत्मा शास्त्र गुरुवाक्य पाहे महावाक्य विवरुनी१०
विवरुनि ब्रम्हीं ब्रम्ह अहमस्मि[1] राम आहे रामी रामदास११

१७१

मायिक वहिलें मिथ्या कोण करी धन्य जो विवरी विवेकानें १
विवेकानें जन भेटतां संकट त्याचि खटपट सुखरूप २
स्वरूप संत सत्या साभिमानी तयांसिच मनीं येरां नाहीं
येरां नाहिं गति सत्यावांचुनियां असत्याचे पायां कोण पडे ४
कोण पडे आतां संदेहाच्या डोहीं कोणाविण नाहीं चाड आम्हां
आम्हां नाहिं चाड ते कोणाएकाची दृढ राघवाची कास धरूं ६
कास धरूं जेणें पावन हो केलें तेथें माझें झालें समाधान ७
समाधान झालें प्रत्ययासि आलें धन्य तीं पाउलें राघवाचीं८
राघवाचीं पदें मानसिं धरिन विश्व उद्धरिन हेळामात्रें ९
हेळामात्रें मुक्त करिन हा जन तरिच पावन राघवाचा १०
राघवाचा दास मी झालों पावन पतितें कोण उरों शके ११
उरों शके ऐसें कल्पांतिं घडेना जो कोणि पुसेना त्यासि उणें १२
उणें न सांगतां माझ्या सूर्यवंशा कोणाचि दुराशा नाहिं आम्हां१३
नाहिं आम्हां उणें राघवाच्या गुणें ब्रीदचि राखणें पावनाचें १४
पावनाचें बीज आम्हां ग्रास झालें प्रचितीस आलें कांहिंएक
तात्काळचि मोक्ष हें ब्रीद रामाचें होतआहे साचें येणें काळें१६

1 अहं-अस्मि-मीआहें. 2 क्रीडेकरून.

कितिएक जन ज्ञानें उद्धरिले कृतकृत्य झाले तात्काळची १७
येणेकाळें मोक्ष जरि मी देईन दास म्हणविन राघवाचा १८
राघवाचा वर पावलों सत्वर जनाचा उद्धार करावया १९
कराया समर्थ राम सूर्यवंशी मज कासयासि रोग आतां २०
रोष जातां राग येईल समर्था हेतों काहिं सत्ता माझि एक २१
माझि सर्व सत्ता जानकिजीवना आतां मी लेखिना ब्रम्हादिकां २२
ब्रम्हादिक माये जनकापासुनी तयासी व्यापुनी राम आहे २३
राम आहे जनिं राम आहे वनीं राम निरंजनीं सारिखाची २४
सारिखाची राम सृष्टि पाहों जातां तोचि पाहा आतां निरंजन २५
निरंजन राम काहो अंतरता मोहुनियां जातां एकिकडे २६
एकिकडे जातां तेथें तोहि राम सांडोनियां राम बरें पाहा २७
बरें पाहा तुम्हीं आतांचि पावाल पावनचि व्हाल रामरूपें २८
रामरूपें सर्व रूपें निवारिलीं आसतचि झालीं नाहिं ऐसीं २९
नाहिं ऐसीं रूपें भिंति चित्राकार तैसा हा आकार स्वप्न जैसा ३०
स्वप्नींचा आकार कल्पनेसि भासे रामरूप ऐसें निर्विकल्प ३१
निर्विकल्प राम कल्पितां होईजे मिळोनि जाईजे रामरूपीं ३२
रामरूपिं सर्व साधन जाहलें पावनचि केलें पावनानें ३३
पावन हो राम जो कोणि पावेल रामचि होइल निजध्यासें ३४
निजध्यास निजवस्तूचा धरावा श्रवण करावा साक्षात्कार ३५
साक्षात्कार होतां सत्य निर्गुणाचा मग या गुणाचा पांग नाहीं ३६

पांग नाहिं ऐसें नेमस्त जाणावें शीघ्रचि सुटावे संवसारीं ३७
संसारीं सुटिजे संसार करितां सर्वहि भोगिता भोगातीत ३८
भोगातीत जैसा श्रीकृष्ण दुर्वासा आत्मज्ञानि ऐसा सर्वकाळ ३९
सर्वकाळ देही आसतां विदेही रामदासिं नाही जन्म मृत्यु ४०

१७२

जाणे सुख दुःख राम माझा एक येरेते मायिक वैभवाची १
वैभवाचि सखि वोरगोनि जाती आत्माराम अंतीं जीवलग २
जीवलग नाहीं श्रीरामावाचूनीं हाचि माझे मनीं दृढ भाव ३
भाव अनन्याचा आहे वरपंगाचा रामेविण कैचा अंतरंग ४
अंतरीची व्यथा श्रीराम सर्वथा जाणवल्या चिंता दुर करी ५
करितो प्रतिपाळ शरण आलियाचा राम त्रैलोक्याचा मायबाप ६
माय बाप बंधु सज्जन सोयरा एका रघुवीराविण नाहीं ७
नाही मज कोणि श्रीराम असतां सत्वर वाहतां उडि घाली ८
उडि घाली मज अनाथाकारणें राम सर्व जाणें अंतरिचें ९
अंतरिचे गुज राम सर्व बीज रामदासीं निज प्रगटलें १०

१७३

छत्रसिंहासनि अयोध्येचा राजा शोभतसे माझा माय बाप १
माझा माय बाप त्रैलोकिं समर्थ सर्व मनोरथ पूर्ण करी २
पूर्ण प्रतापाचा कैवारी देवांचा नाथ अनाथाचा स्वामि माझा ३
स्वामि माझा राम योगियां विश्राम सांपडले वर्म थोर भाग्य ४

थोर भाग्य त्याचें राम ज्याचे कुळीं संकटीं सांभाळीं भावबळें ५
भावबळें जीहिं धरिला अंतरीं तया क्षणभरीं विसंबेना ६
विसंबेना कदा अपुल्या दासासीं राम रामदासी कुळस्वामी ७

१७४

सोडवि जो देव तोचि देवराव येरे सर्व नाव नाथिलेची १
नाथिलेचि नाव लोकामध्यें पाहे ठेवि जेथ आहे प्रतापाचें २
प्रतापाचे नाव एका राघवासी रामीं रामदासी देवराव ३

१७५

पुण्याचें माहेर साधकाचें घर बहुतिचें छत्र स्वामी माझा १
स्वामी माझा राम रायाचें मंडण संसार खंडन महाभय २
महाभय कैसें अभेद भक्तासी रामिं रामदासी धन्य बोला ३

१७६

धन्य सूर्यवंश पुण्य परायण सर्वही सगुण समुदाय १
समुदाय काय सांगु या रामाचा अंतरीं कामाचा लेश नाहीं २
लेश नाही मनीं तया भरतासी सर्वही राज्यासी त्यागीयेलें ३
त्यागीयेलें अन्न केलें उपोषण धन्य लक्षुमण ब्रंम्हचारी ४
धन्य ब्रंम्हचारी मारुति सेवक श्रीरामीं सार्थक धन्य केलें ५
धन्य केला जन्म वाल्मिकीऋषीनें धन्य तीं वचनें भविष्याचीं ६
भविष्य पाहात धन्य विभीषण राघवीं शरण सर्व भावें ७
सर्वभावें रामीं सर्वही वान्नर शरण अवतार विबुधांचे ८

विबुधमंडळी राम सर्वगुण अनन्यशरण रामदास ६

१७७

मनुष्याचि आशा तेचि पैं निराशा एका जगदीशा वांचुनीयां १
वांचुनीयां राम सर्वही विराम नव्हे पूर्ण काम रामेविण २
रामेवीण नव्हे हे कोणि कोणाचे सर्वही मायेचे जायजणें ३
जायजणें ऐसें कोणासि नेणावें वेळेसि जाणवे संकटीच्या ४
संकटाचे वेळे निजाचा सांगाती रामी आदि अंति रामदासी ५

१७८

काय ते करावे संपत्तिचे लोक जानकीनायक जेथें नाहीं १
जेथें नाहीं माझा श्रीराम समर्थ त्याचें जिणें व्यर्थ कोटिगुणें २
कोटीगुणें उणें जिणें त्या नराचें जानकी वराचें नामनाहीं ३
नाम नाहीं मनी नाहीं जो कीर्तिनी नया कां जननी प्रसवली ४
प्रसवली जरि झाला भूमिभार दुस्तर संसार उल्लंघेना ५
उल्लंघेना एका राम नामावीण रामदासी खूण प्रेम भावें ६

१७९

दासाची संपत्ति राम सीतापती जीवाचा सांगाती रामएक १
राम एक माता राम एक पीता राम एक भ्राता सहोदर २
सहोदर विद्या वैभव कांचन सर्वही स्वजन राम एक ३
राम एक स्वामी रामचि कैवारी लाभ तो संसारीं राम एक ४
राम एक ज्ञान राम एक ध्यान राम समाधान रामदासी ५

१८०

१ उसणे.

# अभंग. 

अनाथाचा नाथ देव तो कैवारी सिंहासनावरीं शोभतसे १
शोभतसे राम प्रतापी आगळा दिसे सौम्य लीळा सत्वगुणी २
सत्वगुणी होय सात्विका कारणें कोपें संहारणें दुर्जनासी ३
दुर्जना संहार सज्जनां आधार भाविकासि पार पाववितो ४
पाववितो पार या भवसिंधूचा राघव दिनाचा दीनानाथ ५
दिनानाथ नाम पतित पावन योगीयां जीवन योग लीळा ६
लीळावेष-धारी भक्ताचे माहेर ध्यानीं गौरीहार चिंतितसे ७
चिंतितसे नाम राम पूर्ण काम पावला विश्राम राम नामें ८
रामनामीं हरु विश्रांती पावला हेतों समस्तांला श्रुत आहे ९
श्रुत आहे व्योम-योगावें मंडण संसार खंडण महाभय १०
महा-भय कैचें रामासी भजता हें जाण अन्यथा वाक्य नव्हे ११
नव्हे सोडवण रामनामाविण रामदासी खुण सांगतसे १२

१८१

रामाचें चरित्र सांगतां अपार जाहाला विस्तार तिहीं लोकीं १
तिहीं-लोकीं हेच वाहूनी दिधलें तें आम्हां लाधलें काहिंएक २
काहींएक पुण्य होतें पूर्वजाचें पापीयासि कैंचे राम नाम ३
रामनामें कोटि कुळें उद्धरती संशय धरिती तेचि पापी ४
पापीयाचें पाप जाय एकसरी जरि मनिं धरी राम नाम ५
राम नाम कासी शिव उपदेसी आधार सर्वांसी सर्व जाणे ६
सर्व जाणे अंति रामनामें गती आणि वेदश्रुती गर्जताती ७

गर्जती पुराणें आणि संतजन करावें भजन राघवाचें ८
राघवाचें ध्यान आवडे कीर्तन तोचि तो पावन लोकांमाजीं ९
लोकांमाजी तरे आणि जना तारी धन्य तो संसारी दास म्हणे १०

१८२

क्षण एक चित्तिं राम आठविती तेणें उद्धरती कोटी कुळें १
कोटी कुळें वाट पाहाती तयाची आवडि जयाची रामनामीं २
रामनामें तुटे कुळाचें बंधन पुत्र तो निधान हरि-भक्त ३
हरीभक्त एक जन्मला प्रल्हाद जयाचा गोविंद कयवारी ४
कयवारी हरी राखे नानापरी ऐसा भाव धरी आत्मयारे ५
आत्मयारे हित विचारीं आपुलें सर्व नाशियेलें मायाजाळ ६
मायाजाळ दिसे दृष्टिचें बंधन जाणति सज्ञान अनुभवी ७
अनुभवी संत सज्जन देखसी तेथें राघवासी ठाईं पाडी ८
ठाईं पाडी राम जीवाचा विश्राम जेणें सर्व काम पूर्ण होती ९
पूर्ण होती तुझे मनोरथ सर्व राघवाचा भाव मनीं धरीं १०
मनीं धरी सर्व देवाचा कैवारी ध्यातसे अंतरीं माहादेव ११
महादेव सर्व-जनां उपदेसी रामीं रामदासीं दृढभाव १२

१८३

सोपें सुगम हें नाम राघोबाचें सर्वकाळ वाचे येउं द्यावें १
क्षण एक राम हृदयीं धरीजे तेणें तें पाविजे निज सुख २
येऊं द्यावें वाचे नाम निरंतर तेणें हा संसार तरीजेल ३

तारिजेल रामीं रामदास म्हणे सावधान होणें रामनामी ४

१८४

प्रातःकाळ झाला राम आठवावा हृदयीं धरावा क्षणएक १
क्षणएक राम हृदयीं धरिजे संसारिं तारिजे हेळामात्रें २
हेळामात्रें राम नामें होय गती भाग्यवंत घेती सर्व काळ ३
सर्वकाळ राम नामासीं धरावा वाचे उच्चारावा नाम घोष ४
नामघोष वाचें श्रवण कीर्तन चरणिं गमन देवालयीं ५
देवालयां जातां सार्थक जाहलें कारणिं लागलें कलिवर ६
कलिवर त्वचा जोडूनि हस्तक ठेवावें मस्तक राम-पायीं ७
रामपायीं शिळा झाली दिव्य बाळा तैसाचि सोहळा मानवांसी ८
मानवासी अंति रामनामें गती सांगे उमापती महादेव ९
महादेव सांगे जप पार्वतीसी तोचि तो विश्वासीं राम-दासीं १०

१८५

विश्वासिला जेथें कैलासिचा राव तेथें एक भाव दृढ धरीं १
दृढ धरी भाव वाल्मिकाचें परीं सर्व ऋषिश्वरीं जाणिजेती २
जाणिजे वाल्मीक ऋषि रामायण तारिले पाषाण रामनामें ३
रामनामें उद्धरिलि ती गणिका नेली दिव्यलोका येचि देहीं ४
येचि देहीं गति पावली कुंढणी रामनाम वाणी उच्चारितां ५
उच्चारितां राम पूर्ण सर्वकाम संसारीच्या श्रम दुरी जाय ६
दुरी जाय श्रम आनंद मानसीं रामी रामदासी दृढ-भाव ७

१८६

हरिभक्ती करी धन्य तो संसारी जयाचा कैवारी देव राणा १
देव-राणा सदा सर्वदा मस्तकीं तयासि या लोकीं चाड नाहीं २
चाड नाही जनी राघवाचा दास सार्थक वयस राम-दासीं ३

१८७

धन्य त्याचें कूळ धन्य त्याचा वंश जे कुळीं हरिदास अवतरे १
धन्य ते जननी धन्य तेचि कुशी जे हरिप्रियासी प्रसवली २
धन्य ते संमंधी संताचे सोयीरे सत्संगें उद्धरें कूळ त्याचें ३
धन्य पै तो ग्राम धन्य पै तो देश जेथें हरीदास वैष्णवाचा ४
धन्य त्याचें सख्य वैष्णवीं सर्वदा तेसंगे गोविंदा जीव-लग ५
धन्य ते भाविक वंदिती हरिदास तया ऋषिकेशा वंदितसें ६
धन्य ते निंदक निंदिती सज्जना येणें भावें ध्यान घडे त्यांसी ७
धन्य दासि दास सज्जन सेवेसी ते सुरवरासी वंद्य होती ८
धन्य पशु श्वान वैष्णवा घरीचें कलिकाळ त्यांचें पाय वंदी ९
रामदास म्हणे तरी धन्य होणें हरिसंग लाधनें वैष्णवाचा १०

१८८

हरिभक्तिविण जाऊं नये क्षण या नाव लक्षण सार्थकाचें १
सार्थकाचें जिणें कथा निरूपणें श्रवण मननें काळ गेला २
काळ गेला हरि-भक्तिचेनि योगें साधुचेनि संगे दास म्हणे ३

१८९

सुपुत्र संसारीं कुळाचें मंडण वंश उद्धरण हरिभक्त १

भक्तिं तरतातिं बेताळिस कुळें भक्तिचेनि गुणें जगोध्धार २
जगोद्धार करी सप्रेम संसारी येरे अनाचारी पापरूप ३
पापरूपी नर अभक्त जाणावे तयांसीं नेणवे देव-राणा ४
देव-राणा वळे देखोनियां भाव दास म्हणे भाव कामा नये ५

१९०

धाकुवाचि ध्रुरु तो नव्हे लेकरु जया सर्वेश्वरु प्रगटला १
प्रगटला देव तया उपमन्या भावार्थ अनन्या क्षीरसिंधू २
क्षिरसिंधुवासी स्वयें नारायण प्रऱ्हाद रक्षण करितसे ३
करितो रक्षण-दासासि संकटीं त्याचें नाम कंठीं असोद्यावें ४
असोद्यावें सदा देवाचें चिंतन गजेंद्र पावन नामघोषें ५

१९१

आलिया देवासी वाट चुकलासी म्हणोनि आळसी सवसारीं १
संसाराचें दुःखें करिसि रुदन चुकलें भजन राघवाचें २
राघवाचि भक्ती नेणतां विपत्ती तुज अधोगती जन्म झाला ३
जन्म झाला परि वेगे सोय धरी सत्वर संसारी मोकळिक. ४
मोकळिक होय भक्तिपंथें जातां वाक्य हें तत्वता दास म्हणे ५

१९२

विषय रुदन सोडुनियां द्यावें नित्य नित्य जावें संतसंगें १
संतसंगें बापा होईरे निश्चळ मग तळमळ विसरसी २
विसरसी दुःख संताचे संगती चुके अधोगती गर्भवास ३

गर्भवास आता चुकवि आपुलें धरावी पाउलें राघवाचीं ४

राघवाचें भक्त राघवीं मिळती भेटे सीतापती दास म्हणे ५

१९३

माता पिता जन स्वजन कांचन धिया पुत्रीं मन गोऊं नये १

गोवुं नको मन राघवा वांचुनी लोक लाज जनीं लागलीसे २

लागलिसे परि तुवा न धरावी स्वहितें करावी रामभक्ती ३

रामभक्ती विण होसील हिंपुटी येकले सेवटी जाणें लागे ४

जाणें लागे आतां बाळा सुलक्षणा ध्यायि रामराणा दास म्हणे

१९४

माझें मनिं सर्व सुख व्हावें तुज म्हणोनियां गुज सांगतसें १

सांगतसें हित तें जिवीं धरावें भजन करावें राघोबाचें २

राघोबाचें प्रेम तें करी विश्राम येरे सर्व श्रम जाण बापा ३

जाण बापा वचन हें माझें प्रमाण वाहतसे आण राघवाची ४

राघवाची भक्ती ते माझी विश्रांती असो द्यावी चित्तीं दास म्हणे

१९५

राघवाचें नाम राखसील जरी तुज राखे तरी रामराणा १

रामराणा माझे जिविचें जिवन आवडिने खुण सांगतसे २

सांगतसे खुण माझे अंतरीची सर्वही सुखाची सुखमूर्ती ३

सुख-मूर्ती राम सांडुं नको कदा तुज तो आपदा लागो-नेदी ४

लागो नेदी कष्ट आपुल्या दासासी रामी रामदासी साह्याकारी ५

१९६

रानीं वनिं मनिं राम आसों द्यावा करील कुडावा सेवकाचा १
सेवकाचा भार घेतसें साचार म्हणोनि अंतर पडोंनेदी २
पडोंनेदी शब्द माझा भूमीवरी दृढ चित्तीं धरी देवराणा ३
देवराणा सर्व देवां सोडविता लागलीसे चिंता त्यास तुझी ४
तुझी चिंता करी राजा अयोध्येचा कृपाळु दिनाचा दास म्हणे

१९७

कोणाचें हें घर कोणाचा संसार सांडुनि शरीर जाणें लागे १
जाणें लागे अंतीं एकलें एकटें व्यर्थ खटपटें जन्मवरी २
जन्मवरी देह संसारीं गोविलें नाहि कांहीं केलें आत्महित ३
आत्महित केलें संसाराचे वोडी अंति कोण सोडी रामाविण ४
रामाविण कोणी सोडविना अंती वायाचि रडती जीवलगे ५
जिवलग राम दुरि दुरावला विचार आपुला जाणवेना ६
जाणवेना पूर्व सुकृता वाचुनी पापियाचे मनीं राम कैंचा ७
राम कैंचा जया लौकिकाचि चाड पुरविती कोड संसाराचें ८
संसाराचें कोड तेंचि वाटे सोड जया नाहीं चाड अनुतापीं ९
अनुतापीं जाले संसारी सुटले राजे राज्य गेले सांडोनिया
सांडोनियां गेले वैभव संपत्ती पुढें याता यातीचेनि भेणे ११
भेणें ते शरण निघाले देवासी नेले वैकुंठासी भक्तराज १२
भक्तराज भावें भेटले देवासी रामी रामदासी धन्य वेळ १३

१९८

आपुलि पारखी सर्व पारखिली नाहि कामा आली रामाविणे
रामाविणे जाण सर्वहि पिसुणें मायेचें कारण नाथिलेची २
नाथिलेचि आहे जनाचे साजणे तृणाचें तापणें तयापरी
तयापरी ऐसा निश्चय जाणावा संतिचा बोलावा लोक आहे ४
लोक बहु रंग जाणुनि बेरंग रामदाससंग सांडियेला ५

१९९

सुखाचे संगति सर्वही मिळती दुःख होता जाती निघोनियां १
निघोनिया जाती संकटाचे वेळे रूख होता मिळे समुदाय २
समुदाय सर्व देहाचे समंधी तुटली उपाधी रामदासीं ३

२००

मूर्ख तो संसारी माझे माझे करी मृत्यु बरोबरी हिंडतसे १
हिंडतसे काळ संगाति सरिसा मनीं भरवसा नेणोनिया २
नेणोनियां प्राणि संसारासि आला आला तैसा गेला दैन्यवाणा
दैन्यवाणा गेला सर्वही सांडुनी ठेविलें जोडूनि जनालागी ४
लागहि लागले दोषचि सुटेना अभक्ति तुटेना अंतरिची ५
अंतरिची मूर्ति अंतरलि द्वारी करा काळी हरी आठविना ६
आठविना अंतकाळी रामाविण धन्य तें मरण दासम्हणे ७

२०१

काया हे काळाची घेवोनि जाणार तुजेनि होणार काय बापा
काय बापा ऐसें जाणोनि नेणसी मिमि म्हणतोसि वायाविण २

वायाविण शीण केला जन्मवरी दंभ लोकाचारी नागवण ३
नागवण आली परलोका जातां स्वहिताचि चिंता केली नाही ४
केली नाही चिंता नामी कान कोंडें अंति कोण्या तोंडें जात असे
जात असें सर्व सांडोनि करंटा जन्मावरि ताटा धरुनिया ६
धरुनियां ताटा कासया मरावें भजन करावें दास म्हणे ७

२०२

चंद्रासि उद्योग सर्वकाळ मनी माझें पद कोणी घेईनाकी १
घेईनाकी कोणी बळियादानव घालिनाकि देव कारागृहीं २
कारागृह देवादिकांचें चुकेना तेथें काय जना चुकवेल ३
चुकवेल भोग हे काहि घडावें लागेल भोगावें केलें कर्म ४
केलें कर्म स्फटें जरि भ्रांति फिटे दास म्हणे भेटे संतजना ५

२०३

रावणासारिखे कोणाचि संपत्ति तोहि गेला अंति एकलाची १
एकलाचि गेला बाळितो वान्नर कपि थोर थोर तेहि गेले २
गेले चक्रवर्ति थोरा वैभवाचे फार आयुष्याचे ऋषेश्वर ३
ऋषेश्वर गेले मार्कंडासारिखे इतरांचे लेखें कोण करी ४
कोण करी सर्व शाश्वत आपुलें सर्व राज्य गेलें कौरवांचें ५
कौरव निमाले पांडव गळाले यादवहि गेले एकसरें ६
एकसरें गेले राजे थोर थोर आणिक श्रीधर भाग्यवंत ७
भाग्यवंत गेले एकामागें एक हरिश्चंद्रादिक पुण्यशीळ ८

पुण्यशीळ गेले कीर्ति ठेउनिया पापि गेले वाया अधोगती ९
अधोगती गेले देवा न भजतां संसारीं म्हणतां माझें माझें १०
माझें माझें करी साचाचिये परी अंती दुराचारी एकलाची ११
एकलाची येतां एकलाची जातां मध्येचि दुश्चिंता मायाजाळी १२
मायाजाळीं पापीजन गुंडाळले पुण्यशीळ गेले सुटोनिया १३
सुटोनियां गेले सायोज्यपदासी रामी रामदासी चिरंजीव १४

२०४

स्वप्न हा संसार मायिक वेव्हार म्हणोनि साचार मानु नये १
मानु नये सर्व जायाचें आपुलें त्याचें त्याणें नेलें दुःख काय २
दुःख काय आतां स्वप्नसुख जातां साच तें तत्वतां दृढ धरा ३
दृढ धरा मनीं जानकीजीवन तेणें समाधान पावशील ४
पावसील सुख स्वरूप आपुलें जरि तें घडलें रामदास ५

२०५

रामदासा घडे बहुतां सुकृतें कांहीं पुण्य होतें पूर्वजाचें १
स्वप्नींच्या सुखानें सुखावला प्राणी थोर झाली हाणी जागृतीसी २
जागृतीस नाहीं स्वप्नींचें तें सुख तेणें झालें दुःख बहुसाल
बहु साल खेद मानिला अंतरीं वायां झडकरी जागा जाला ४
जागा झाला म्हणे वाया अवचिता निजोनि मागुता सुख पाहे
सुख पाहे पुन्हा स्वप्नी तें ना दिसे भयानक दिसे प्राणियासी ६
प्राणियासी दुःख जाहलें मागुतें जागा जालिया तें सर्व मिथ्या

मिथ्या सुख दुःख स्वप्नींचा वेव्हार तैसा हा संसार नाथिलाची
नाथिलाचि जाय क्षण आनंदाचा सर्वेची दुःखाचा क्षण आहे
क्षण एक मन राघवीं सावध तेणें नव्हे खेद दास म्हणे १९

२०६

सुख पाहों जाता कायेची नादिसे संसार हा असे दुःखमूळ
दुःखामूळें जन्म नरा आणि नारी पाह्यतां संसारीं सुख नाहीं
सुख नाहीं कदा शाश्वता वाचोनी जाणतीळ ज्ञानी दास म्हणे

२०७

स्त्रियाचें हो जिणें पराधीन झालें पुरुषें विकीलें आपणासी
आपणा विकीलें या पोटा कारणें पराधीन जीणें सहजची २
सहजची झालें सर्व पराधीन सत्यचि वचन दास म्हणे ३

२०८

वासनेची झाडी कुबुद्धि वांकुडी वाजे हुडहुडी ममतेची १
वैराग्याचा वन्ही विझोनियां गेला संचित खायाला पुण्य नाहीं २
भक्तिपांघुरण तें माझें सांडलें मज वोसंडिलें संतजनीं ३
नाम संजीवनि मुखिं नाहीं पाणी निंदेचि पोहणी प्रबळेची ४
रामदास म्हणे ऐसियाचें जिणें सदा दैन्यवाणें रामेविण ५

२०९

लोभाचे विराडीं कामि घाली उडी वायाची वेगडी वळतसे १
सदा भक्तीवीण जालें उपोषण झड घाली अन्न खावयासी

मायाजाळें आगी फुटली अंतरीं पराघरीं चोरी करीतसे ३
अंगही चोरीतां अंगही फुजलें नाहि झिजविलें रामालागी ४
रामदास म्हणे प्राणि भक्तिउणे तयालागी सूणे आतळेना ५

२१०

रात्रंदिवस मन राघवीं असावें चिंतन नसावें कांचनाचें १
कांचनाचें ध्यान परस्त्री चिंतन जन्मासि कारण हेंचि दोन्ही
दोनि नको धरु नको निंदा करु तेणें हा संसारु तरसील ३
तरसील भवसागरीं बुडतां सत्य या अनंताचेचि नामें ४
नामरुपातीत जाणावा अनंत दास म्हणे संतसंग धरा ५

२११

ब्रम्हा विष्णु रुद्र जयाचे अवतार तोचि देव थोर जाण बापा १
जाण बापा देव देवासि निर्मीता देव तूं तत्वता ठाईं पाडी २
ठाईं पाडी देव संताचे संगती दास म्हणे गती पावशील ३

२१२

मर्यादा सागरा आणि दिनकरा अंतरिक्ष तारा जयाचेनी १
जयाचेनी मेघ पडे भूमंडळीं पिके यथाकाळीं वसुंधरा २
वसुंधरा बहु रंग विस्तरिली जीवसृष्टी झाली जयाचेनी ३
जयाचेनी सर्व सृष्टि चालताहे तयालागी पाहे शोधूनिया ४
शोधूनिया पाहे देव सर्व कर्ता तरिजे ओवर्ता जयाचेनी ५
जयाचेनी भक्ती जयाचेनी मुक्ती जयाचेनी युक्ती वाटतसे ६

१ साधुप्रीति. २ संसारचक्र.

संतसंग जया मानवा आवडे तेणेंगुणें घडे समाधान ६
समाधान घडे सज्जनाचे संगें स्वरूपाच्या योगें रामदासीं ७

२१३

ज्याच्या निरूपणें संदेह फिटती त्यागती संगती सज्जनाची १
दुर्जनाची कळा सज्जनाचे परी मधिंद्राची सरी आम्हणासी २
आम्हणासी नाहीं सर्वदा मत्सर झडु निरंतर दास म्हणे ३

२१४

जया जैसि गती त्या तैसी संगती समागमें रिती सर्वकाहीं १
सर्व काहीं घडे संगतिच्या गुणें साधुचीं लक्षणें साधूसंगें २
साधूसंगें साधू होयिजे आपण रामदास खूण सांगतसे ३

२१५

दुर्लभ हा जन्म विषय नर देह याहिवरी सोय राघवाची १
राघवाची सोय सद्भावें भजन आणि संतजन समागमीं २
समागमीं संत श्रवणीं निवांत अनंताचा अंत ठाई पडे ३
ठायींपडे देव संतसमागमें आपल्या स्वधर्मे पुण्यशीळ ४
पुण्यशीळ देह ज्ञानी निःसंदेहें सर्वकाळ राहे स्वस्वरूपीं ५
स्वस्वरूपीं मन गेलिया उन्मन मग मिथ्या भान आढळेना ६
आढळेना कदा मिथ्या माया-जाळ तोचि तो केवळ समाधानी ७
समाधानी साधू जेथें ज्ञानबोधु रामदासीं बोधू निर्गुणाचा ८

२१६

समाप्त.